# नवभारत

या अंकात –




वर्ष २७

अंक पहिला

ऑक्टोबर १९७३

रु. १–२५



अनुक्रमणिका












नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सत्ताविसावे अंक एक

# नवभारत

ऑक्टोबर १९७३

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :

१ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
प्राध्यापकांचे निवासस्थान
कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | किंमत |
|---|---|
| १. धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | |
| साधी बांधणी | ८०.०० |
| कापडी बांधणी | १०४.०० |
| २. धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | |
| साधी बांधणी | १५०.०० |
| कापडी बांधणी | १८२.०० |
| ३. धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | ४५.०० |
| कापडी बांधणी | ६३.०० |
| ४. मीमांसाकोश भाग १ ते ७ ( संपूर्ण ) | २५०.०० |
| ५. कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ६.०० |
| ६. बौद्धागमार्थसंग्रहः | २०.०० |
| ७. वैदिक संस्कृतीचा विकास (सुधारून वाढविलेली आवृत्ती) ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ३०.०० |
| ८. नवमानवतावाद | २.५० |
| ९. मानवाचा आदर्श | ३.०० |
| १०. चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ३.०० |
| ११. गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी ) | २.५० |
| १२. महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना (श्री. चा. अ. दाभोलकर ) | २.०० |
| १३. सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती (श्री. प्र. रा. देशमुख ) | ४.०० |
| १४. इतिहासाचे तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | ६.०० |
| १५. लोकशाहीचे धोके (श्री. पन्नालाल सुराणा) | २.०० |
| १६. भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) | २.०० |

श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

# पुरोहितवर्गवर्चस्वाचे रहस्य*

डॉ. श्री. सुमंत मुरंजन यांचे "पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास" हे पुस्तक प्रकरणशः नवभारत मासिकात क्रमशः प्रसिद्ध झाले असून ते आता समग्र पुस्तक रूपाने प्रसिद्ध होत आहे. भारताच्या एकात्मतेचा किंवा एकराष्ट्रीयत्वाचा प्रश्न समजून घेण्याकरिता भारताच्या सामाजिक इतिहासाची मीमांसा समजणे आवश्यक आहे. अशा मीमांसेची एक महत्त्वाची बाजू या पुस्तकात मांडली आहे.

वेदपूर्वकालापासून तो अद्ययावत घडलेल्या इतिहासपूर्व व इतिहासकालीन घटनांचा परामर्श यात संक्षेपाने घेतला आहे. हा परामर्श घेत असताना सामाजिक रूढी किंवा चालीरीती, उच्चनीच धार्मिक विचारप्रवाह, धार्मिक परिवर्तने, राजकीय घडामोडी इत्यादिकांचे विवेचनही यात संदर्भानुसारे आले आहे. ही सर्व मीमांसा ब्राह्मण किंवा पुरोहितवर्ग याच्या वर्चस्वाच्या अनुरोधाने आली आहे. मुख्य प्रेरणा कार्ल मार्क्सची. त्याच्या वर्गविग्रह व पिळवणूक या ऐतिहासिक भौतिकवादाच्या तत्त्वापासून डॉ. मुरंजन यास ही प्रेरणा मिळाली आहे, हे त्यांनी प्रथमच स्पष्टपणे सांगून टाकले आहे. महात्मा ज्योतीराव फुले यांनी प्रथम महाराष्ट्रात ब्राह्मणी वर्चस्वाच्या मीमांसेचा शुभारंभ केला; त्याच सुमारास ब्राह्मण व ब्राह्मणविद्या यांचे परखड मूल्यमापन लोकहितवादींनी केले. म. फुले व लोकहितवादी यांचा निष्कर्ष जवळजवळ एकच आहे. त्यानंतर या विषयावर मराठी व इतर भारतीय भाषांमध्ये परंपरागत हिंदु धर्म, जातिसंस्था आणि पुरोहितवर्गाच्या वर्चस्वाचे अनिष्ट परिणाम यांची मीमांसा ब्राह्मसमाज, आर्यसमाज, अन्य धार्मिक व सामाजिक सुधारक, तमिळनाडमधील जस्टिस

---

* डॉ. सुमंत मुरंजन यांच्या 'पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास' या पुस्तकास तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी लिहिलेली प्रस्तावना आम्ही येथे उद्धृत करीत आहोत.– कार्यकारी संपादक.



अनुक्रमणिका






पार्टींचे प्रवक्ते इत्यादिकांनी केली आहे. या मीमांसेत या पुस्तकाने अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण अशी भर घातली आहे.

जातिसंस्था ही पुरोहितवर्गवर्चस्वामुळेच दीर्घकाल आतापर्यंत हजारो वर्षे स्थिरावली हे डॉ. घुरये यांचे मत निःसंशय ग्राह्य होय. जातिभेद किंवा वर्णभेद हा वंशभेदावर अधिष्ठित नाही. उच्चनीच जातिभेदाची कारणे पुष्कळ आहेत. त्यापैकी वंशभेद हेही एक काही थोड्या जातींच्या बाबतीत लागू पडू शकेल; परंतु वंशभेदाचे निश्चित गमक कोणत्याही एका जातीत सापडणे फार कठीण आहे. याचे पहिले कारण असे की मनुष्य अस्तित्वात आल्यापासून मानवी गटांनी वंशभेद कधीच पाळला नाही. निरनिराळ्या कारणांनी जे जे मानवी गट जवळ आले, एकत्र आले, ते ते स्त्री–पुरुषांच्या नैसर्गिक आकर्षणशक्तीमुळे मिसळतच गेले. भौगोलिक किंवा प्रादेशिक दीर्घ अनुल्लंघ्य अंतरावर जे जे मानवी समूह दीर्घ काळ स्थिरावले त्यांच्यात दूरच्या वंशांची सरमिसळ झाली नाही. परंतु जे जे जवळ आले ते ते कामदेवाच्या अनिवार्य व अदम्य पखरणीखाली सर्व सामाजिक विधिनिषेधांच्या काल्पनिक मर्यादांना न जुमानता एकमेकात मीलन पावलेच. भौतिकी मानवशास्त्राने ही गोष्ट निर्विवादपणे सिद्ध केली आहे. काळे, गोरे, पिवळे किंवा उंच, ठेंगू, मध्यम उंचीचे, तसेच वाटोळ्या, लांबोड्या, थिट्या व उंचाड्या डोक्याचे वा काळ्या व घाऱ्या डोळ्यांचे वा सरळ व कुरळ्या केसांचे मानव हे जेव्हा जेव्हा जवळ आले तेव्हा तेव्हा मिसळलेच.

चार वर्ण म्हणजे चार पृथक मानववंश असे समीकरण पूर्णपणे असिद्ध झाले आहे. महाभारतातच वनपर्वात सर्प-युधिष्ठिर संवादात त्याचप्रमाणे शांतिपर्वातील भृगु-भारद्वाज संवादात सगळ्या वर्णांत एकसारखे पुष्कळ लोक दिसतात; संकराशिवाय एकही वर्ण नाही, म्हणून वर्णभेद कशावरून ओळखावा, असा प्रश्न ठणठणीतपणे विचारला आहे. आणि एक निष्कर्ष असा सांगितला आहे की शूद्र शूद्र नव्हे व ब्राह्मण ब्राह्मण नव्हे; कर्मानेच शूद्र की ब्राह्मण हे जाणावे. सर्वच मुळात एक; जातीवर गुणकर्म अवलंबून नाही; मुळात सगळेच ब्रह्म म्हणजे ब्राह्मण होत; गुणकर्मविभागांनी वर्णभेद उत्पन्न झाले. बृहदारण्यक उपनिषदातही चातुर्वर्ण्योत्पत्ती होण्याच्या प्रारंभी प्रथम ब्रह्म म्हणजे ब्राह्मणच होता व त्याच्यातून नंतरचे तीन वर्ण उत्पन्न झाले असे म्हटले आहे. ऋग्वेदातील पुरुषसूक्तातील विराट पुरुष एकच असून चार वर्ण हे त्याचे अवयव होत असे म्हटले आहे.

ब्राह्मण जात ही हिंदू समाजात पावित्र्याने व अधिकाराने सर्वोच्च मानली आहे. हिंदुस्थानातील बहुतेक प्रत्येक प्रांतात किंवा आजच्या बहुतेक प्रत्येक प्रदेश राज्यांमध्ये तीस-पस्तीस किंवा त्यापेक्षा कमीजास्त ब्राह्मण पोटजाती आहेत. दोनतीन राज्येच यास अपवाद आहेत. महाराष्ट्रात कमीत कमी २७ ब्राह्मण पोटजाती आहेत असे कै. महादेवशास्त्री दिवेकर यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळाच्या वतीने सर्वेक्षण करून प्रसिद्ध केलेल्या 'ब्राह्मण पोटजातींचे एकीकरण' या पुस्तकात साधार दाखवून दिले आहे. या पोटजातींपैकी काही पोटजातींमध्ये विवाह व अन्नोदक व्यवहारही आतापर्यंत वर्ज्य मानला जात होता. वंशशास्त्रदृष्टया चित्पावन ब्राह्मण व देशस्थ ब्राह्मण यांच्यात जितके साम्य आहे, त्यापेक्षा देशस्थ ब्राह्मण व महाराष्ट्रातील शिंपी, कासार, सुतार, कुणबी, माळी, तेली, चांभार, महार इत्यादिकांमध्ये अधिक वंशीय साम्य आहे असे निश्चित झाले आहे. चित्पावन ब्राह्मणातही देशस्थांशी वंशसाम्य असलेल्या शेकडा २०-२५ व्यक्ती तरी सापडतात. पंजाबी सारस्वत ब्राह्मण व मैथिली ब्राह्मण यांच्यात वंशीय साम्य जितके आढळते त्यापेक्षा पंजाबी सारस्वत व चित्पावन यांच्यात अधिक आढळले; असेही आढळून आले आहे की त्या त्या प्रदेश-राज्यातून अनेक ब्राह्मण पोटजाती ह्या, त्या त्या प्रदेश राज्यातील ब्राह्मणेतर बहुजनसमाजाशी समान अशा वंशीय लक्षणांनी अन्वित आहेत.

कुलपरंपरागत स्थिरावलेली सामाजिक कर्मांची वा व्यवसायांची वाटणी हे जातिभेदाचे एक महत्त्वाचे कारण आहे. त्या त्या प्रदेशात स्थिरावलेल्या ग्रामसंस्थांमध्ये जीवन व्यवस्थित रीतीने चालविण्याकरिता सामाजिक कर्मांची वाटणी होत असते किंवा त्या त्या व्यवसायाच्या गटांना मान्यता प्राप्त होत असते, असा समाजशास्त्राचा एक सर्वमान्य सिद्धांत आहे. कर्मांची वा व्यवसायांची वाटणी होत असताना त्या त्या कर्माचे कौशल ज्या सामाजिक गटात असते तो तो गट, आपली जीविका त्या कर्मातून निर्माण होते, म्हणून त्या कर्माला चिकटून रहातो. व्यवसायांच्यामध्ये उच्चनीच व्यवसाय असतात अशा तऱ्हेच्या भेदभावाच्याही कल्पना निर्माण होत असतात. काही गट वा व्यक्ती आपले व्यवसाय बदलून निराळे व्यवसाय करू लागतात. तेव्हा कित्येक वेळा सामाजिक विग्रह आर्थिक स्पर्धेमुळे किंवा वर्गीय उच्चनीचतेच्या कल्पनेला आधार असलेल्या सत्तास्पर्धेमुळे उत्पन्न होतो. परंतु प्राचीन भारतीय समाजसंस्था स्थैर्य निर्माण करण्याच्या प्रवृत्तीला महत्त्व देत होती. स्थितिशीलता ही तिची सर्वसामान्य प्रवृत्ती बनत गेली. या स्थितिशील प्रवृत्तीला अनेक आर्थिक, राजकीय व सामा-

जिक कारणे झाली आहेत. स्थितिशीलतेच्या प्रवृत्तीचाच परिपाक म्हणजे जातिसंस्थेची पोलादी चौकट होय.

ही पोलादी दृढता जातिसंस्थेला हजारो वर्षे येत गेली आणि सुमारे तीन हजार उच्चनीच जाती-उपजातींचे गट निर्माण झाले. तथाकथित स्थितिशील समाजसंस्थेमध्येसुद्धा जातींची परिवर्तने घडली आहेत. परिवर्तनशीलता हा विश्वस्वभाव आहे. सगळेच हळूहळू व कित्येक प्रसंगी वेगाने बदलत असते. भिन्नभिन्न प्रदेशातील मानवी गटांची दूरवर स्थलांतरे होतात. प्रभावशाली गटांमध्येच सैनिकी सामर्थ्य जबरदस्त असल्यास ते नव्या प्रदेशात सत्ता स्थापित करून समाजातील सत्ताधारी उच्चवर्ग बनतात. या उच्च सत्ताधारी वर्गाशी हातमिळवणी करणाऱ्या भिन्नभिन्न सामाजिक गटांनाही सापेक्षत: उच्च सामाजिक स्थान प्राप्त होते. स्थलांतरित सामाजिक गट उच्चतर संस्कृतीचे असल्यास आणि प्रस्थापित सत्ताधारी वर्गाची त्याला मान्यता मिळाल्यास सैनिकी सामर्थ्य नसले तरी त्यांना सामाजिक उच्चपद लाभते. उच्चस्थानी असलेले सामाजिक व्यवसायाचे गटही कित्येक वेळा खाली दडपले जातात. एकंदरीत या प्रक्रियेप्रमाणे भारतात अनेक जाती-जमाती वर गेल्या तशा खालीही गेल्या. वर्ण बदलले व जाती बदलल्या पण जाती बदलत असता त्यांनाही जातिलक्षण मिळालेच. भारताच्या बाहेरच्या ज्या जातिसंस्था नसलेल्या जमाती भारतात वारंवार आल्या, स्थिरावल्या, त्यांना उच्चनीच हे जातींचे लक्षणही वेळोवेळी प्राप्त झाले. काही परंपरागत जातीत समाविष्ट झाल्या तर काही भिन्न जाती म्हणून राहिल्या. भारतातही जातिसंस्था नसलेल्या प्राचीन जमाती होत्या व अजूनही आहेत. त्यांच्यातील काहींनी जातिसंस्थेचे रूप धारण केले व काहींचे मुळचे नामाभिधान जातिवाचक बनले. उदा० भिल्ल, गोंड, कोळी, कातकरी इत्यादी जमाती होत. त्या सर्वांना शूद्र किंवा अतिशूद्र असे वर्णवाचक नाम प्राप्त झाले.

जातिसंस्थेचे किंवा वर्णव्यवस्थेचे मूळ कोठे आहे याबद्दल मानवशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ यांच्यामध्ये मतभेद आहेत, काहींच्या मते ऋग्वेदकाली म्हणजे इ० स० पू० १५०० च्या सुमारास किंवा ऋग्वेदपूर्वकालात म्हणजे इ० स० पू० २५०० वर्षांपूर्वी भारतात आक्रमक आर्य जमाती आल्या व त्यांनी भारतातील आर्येतरांना म्हणजे दासांना व दस्यूंना आपल्या सत्तेखाली आणले तेव्हा जित व जेते यांच्यात रंगाचा, वंशाचा भेद असल्यामुळे प्रथम आर्य व अनार्य असा सामाजिक भेद सत्तेच्या जोरावर आर्यांनी स्थापित केला. हा एका अर्थी वंशभेदच होता.

या मताप्रमाणे कालांतराने आर्य व दास यांच्यात शरीरसंबंध व विवाह होऊन वंशांची सरमिसळ झाली. दास किंवा दस्यु शब्दाचा गुलाम असा अर्थ आहे. परंतु दास किंवा दस्यु याचा मूळचा अर्थ गुलाम असा नाही. दास किंवा दस्यु म्हणजे दूर ठेवणारा. दस धातूचा अर्थ अपक्षेपण, मार देऊन दूर ढकलणे असा आहे. आक्रमक आर्यांना मारून दूर ढकलणारे किंवा त्यांच्यापासून दूर रहाणारे अथवा त्यांच्याशी दुरावा ठेवणारे असा दास किंवा दस्यु शब्दाचा मूळचा अर्थ आहे. ऋग्वेदातील आर्य व दास यांच्यामधील संग्रामांच्या वर्णनावरून हाच अर्थ समर्थित करता येतो. 'पणि' नामक आर्यांच्या शत्रूंचा उल्लेख ऋग्वेदात आहे. हे परदेशी व्यापारी लोक होते परंतु यांचेही पौरोहित्य ऋग्वेदातील पुरोहितांनी केलेल्याचा निर्देश ऋग्वेदात आहे. डॉ. सुरंजन म्हणतात त्याप्रमाणे आर्य व दास हे कालांतराने एकमेकात मिसळले हे खरे आहे. जातिसंस्थेच्या उगमा-संबंधी दुसरे मत असे आहे की, मुळात आर्यांना जातिसंस्था माहीत नव्हती. जातिसंस्थेचे प्राथमिक स्वरूप मूळचे भारतीय आहे व आर्य तर अभारतीय होते. या अभारतीय आर्यांनी भारतात आल्यावर हळूहळू जातिसंस्था मान्य केली व आत्मसात केली. आर्यांमध्ये पुरोहितवर्ग होता, परंतु पुरोहितवर्गाची जात नव्हती. आर्यपूर्व भारतीय समाजात पुरोहित वर्ग उच्च स्थानावर होता. कोणत्याही आधुनिक युगापूर्वीच्या जगातील विकसित सामाजिक संस्थेत पुरोहितवर्ग मानाने व कित्येक वेळा सत्तेने उच्चस्थानी राहिलेला दिसतो. तसेच असे दिसते की, मोहेंजोदडो व हडप्पा येथील आर्यपूर्व सुसंस्कृत भारतीय समाजात पुरोहितवर्ग उच्चस्थानी होता. याचे एक महत्त्वाचे कारण आर्यपूर्व भारतीय समाजांमध्ये सैनिकी शक्तीने संपन्न असा सत्ताधारी लढाऊ वर्ग नव्हता. हडप्पा संस्कृती-मध्ये लढाऊ हत्यारे सापडत नाहीत हे त्याचे गमक होय. परंतु धार्मिक कर्मकांडाचा साधनसंभार, चित्रे इत्यादी भरपूर सापडतात. आर्य भारतात जेते म्हणून आले व संपूर्ण कबजा बसवण्याचा प्रयत्न करू लागले तेव्हा लढाईत जिंकलेल्या समाजात कायदा व सुव्यवस्था निर्माण करून शांतता प्रस्थापित करणे जड जाऊ लागले. म्हणून त्यांनी येथील पुरोहितवर्गाला आपल्या यज्ञीय संस्कृतीची दीक्षा देण्याचा सपाटा चालविला. डॉ. दा. ध. कोसंबी यांनी याची प्रमाणे दिली आहेत. कारण पुरोहित वर्गास मानणाऱ्या समाजाला नांदवायचे तर पुरोहितवर्ग वश करावा लागतो. निःशस्त्र पुरोहित-वर्गास मान्यता व उच्चस्थान दिल्याने सत्ता निष्कंटक रीतीने चालविणे आर्यांना शक्य झाले. भारतातील ब्राह्मणवर्ग पाहिला तर तो मोठ्या संख्येने आर्यवंशीय ठरत नाही परंतु आर्यांच्या संस्कृतीचा प्रस्थापक व धुरंधर मात्र

ठरतो. गेल्या १२०० वर्षांचा इतिहास तर असे सांगतो की मोठ्या प्रमाणात आर्येतर वंशीय असलेल्या नर्मदेखालच्या दक्षिणी ब्राह्मण जमातींनीच वेदशास्त्रांची विद्या अधिक सामर्थ्याने संरक्षिली. शंकराचार्य, सुरेश्वराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य इत्यादी मोठमोठे वेदांतसंप्रदाय- प्रवर्तक गेल्या १२०० वर्षांत दक्षिणेतच निर्माण झाले. उत्तरेकडे आर्यांचे वस्तान बसल्यावर इ. स. पू. सहाव्या शतकात आर्य संस्कृतीच्या बुद्धाने व जैन तीर्थंकरांनी आर्यांच्या हीनधर्मीय वेदोक्त याज्ञिक संस्कृतीचा त्याग करून आर्यपूर्व उच्चतर धर्मसंस्थेला उजळा दिला आणि तिला आर्य संस्कृतीत समाविष्ट करून घेतले.

डॉ. एम्. एन्. श्रीनिवास यांनी भारतीय संस्कृतीच्या परिवर्तनाचा महत्त्वाचा सिद्धांत संस्कृतात्मीकरण ( Sanskritization ) होय असे म्हटले आहे. ही संस्कृतात्मीकरणाची प्रक्रिया बुद्ध व महावीर यांच्याच काळी एका अर्थी सुरू झाली. एका अर्थी म्हणण्याचे कारण बौद्धांनी आणि जैनांनी प्रारंभी प्राकृत भाषांचाच धर्मोपदेशार्थ स्वीकार केला, संस्कृत भाषेचा नव्हे. परंतु बौद्ध व जैन यांनी इसवी सनाच्या प्रारंभी संस्कृताचा आश्रय संपूर्णपणे घेतला. अर्थात आर्यांत सामील झालेल्या येथील ब्राह्मणवर्गाने संस्कृतात्मीकरण बुद्ध व तीर्थंकर यांच्या अगोदर सुमारे हजार-बाराशे वर्षांपूर्वीच सुरू केले होते. जातिसंस्था ही मूळची आर्येतरांची असली तरी ब्राह्मणांनी तिच्यावर संस्कृताचा दृढ व खोल संस्कार केला. म्हणजे श्रुती, स्मृती व पुराणे यांच्यातील चातुर्वर्ण्याची परिभाषा जातिसंस्थेला ब्राह्मणांनी लागू केली. विशेषत : असे की जातिसंस्थेमध्ये उच्चनीच भावाचे तत्त्व खोल रुजवण्याकरिता चातुर्वर्ण्याची कल्पना वापरली; शेकडो किंवा हजारो जातींना चातुर्वर्ण्याच्या परिभाषेत बसवण्याकरिता वर्णसंकराची काल्पनिक उपपत्ती स्वीकारली. ही चातुर्वर्ण्याची उपपत्ती वंशवादाची दर्शक नाही; ती व्यवसायांच्या द्वारे केलेले उच्चनीच वर्गीकरण आहे. अर्थात ती वर्गवर्चस्वाच्या तत्त्वावर आधारलेली आहे. प्रथम भारतीय समाज ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार उच्चनीच वर्णांत विभागलेला आहे अशी कल्पना केली. कारण उच्चनीच वर्ग उत्पन्न झाले होते. चार वर्णांच्या बाहेरच्या जमातींना बाह्य किंवा म्लेच्छ अशी संज्ञा दिली. या बाह्यांना काही स्मृतिकार ' निरवसित शूद्र ' म्हणू लागले. अस्पृश्यांना पातंजल महाभाष्यात (इ० स० पू० दुसरे शतक) निरवसित शूद्र म्हटले आहे. शूद्र म्हणजे मूळचे वैदिक संस्कृतीच्या बाहेरचे लोक येथील वैदिक संस्कृतीच्या कक्षेतल्या सामान्य जनांना म्हणजे ब्राह्मण व सत्ताधारी क्षत्रियांच्या व्यतिरिक्त

असलेल्या सामान्य समाजाला वैश्य म्हणत. वैश्यांचे व्यवसाय अर्थोत्पादन व अर्थविनिमयाचे होत. परंतु अर्थोत्पादनाचे व अर्थविनिमयाचे अथवा व्यापाराचे व्यवसाय करणारे लोक वैदिक संस्कृतीचा स्वीकार न करता तसेच राहिले. अनेक लढाऊ जमाती म्हणजे क्षत्रिय जमातीही आर्य संस्कृतीच्या बाहेर राहिल्या. त्या सर्वांना वैदिक संस्कृतीचे ब्राह्मण एकतर आर्यसंस्कृतीत समाविष्ट करण्याचा प्रयत्न करीत किंवा समाविष्ट करण्यात यश न आल्यास त्या वैश्यांना व क्षत्रियांना शूद्र म्हणून संबोधित. बौद्ध व जैन धर्माचा मुख्य सामाजिक आधार हाच अवैदिक वैश्य व क्षत्रिय बनला. म्हणूनच बौद्ध धर्माचा भारतात पहिल्या सहस्रकात वेगाने प्रसार झाला.

जातिभेद ही संस्था जगात अन्यत्र कोणत्याही राष्ट्रात आढळत नाही. ते भारताचे व विशेषतः हिंदू समाजाचे नितांत वैशिष्ट्य आहे. आदिकालापासून जगाच्या इतर भागांतून पूर्वेकडून, उत्तरेकडून, पश्चिमेकडून आणि इतर बाजूंनी समुद्रातून जे जे मानववंश किंवा जमाती भारतात आल्या त्या बहुतेक येथेच स्थिरावल्या. त्यांच्या संस्कृतीचे उच्चनीच असे भिन्न स्तर होते. त्यांची वंशीय लक्षणेही भिन्न भिन्न होती. त्यांच्या धार्मिक व अन्य चालीरीती व रूढी विचित्र होत्या. त्यामुळे त्या येथे स्थिरावत असताना त्यांच्यामध्ये थोडयाबहुत अंशाने अलगपणाही राहिला. एकाच प्रदेशात व एकाच जवळजवळच्या वसाहतीत व ग्रामामध्ये रहात असताही त्यांची एकमेकात एकरूप होण्याची प्रवृत्ती मंद होती. पवित्र, धार्मिक समजल्या गेलेल्या चालीरीतींच्या वेगळेपणामुळे जमातींचे वेगळेपण स्पष्ट होत होते. हा धार्मिक वेगळेपणा शेकडो प्रकारचा असल्यामुळे हे शेकडो गट वेगवेगळे राहण्याचा किंवा एकमेकांशी एकजीव न होण्याचा प्रयत्न करीत होते. तरीदेखील एकमेकांच्या वेगळ्या देवदेवतांचे, आराधनेचे वा पूजेचे प्रकार एकमेकांनी स्वीकारलेच; परंतु सामाजिक दृष्टया एकजीवपणा येऊन विवाह व अन्नोदक विवाह या संबंधात वेगळेपणा राहिल्यामुळे सामाजिक एकरूपता जगातील प्राचीन काळच्या किंवा मध्ययुगाच्या राष्ट्रांमध्ये जशी उत्पन्न झाली तशी उत्पन्न झाली नाही. वंशसंकर मात्र होण्याचा थांबला नाही. चीन या प्राचीन राष्ट्राचे उदाहरण सोडल्यास बाकीच्या प्राचीन राष्ट्रांमध्ये ख्रिस्त, महंमद इत्यादी प्रेषितांच्या ऐकान्तिक धर्मांनी सामाजिक एकीकरणाची प्रक्रिया झपाटयाने बऱ्याच अंशी पूर्ण केली. चीनचे सामाजिक एकीकरण होण्याची निराळी कारणे आहेत. बुद्धधर्मानेही भारताबाहेरच्या राष्ट्रांमध्ये एकीकरणाच्या





प्रवृत्तीला बराच हातभार लावला परंतु भारतामध्ये बुद्ध धर्माला एकीकरणाची सामाजिक प्रक्रिया सबळ करता आली नाही. त्रिपिटक व अन्य बौद्ध धर्मग्रंथ पाहिले तर बौद्ध धर्माच्या उदय व प्रसाराच्या काळी जातिसंस्थेला जबरदस्त धक्का देण्याची प्रवृत्ती बौद्ध धर्मप्रसारकात नव्हती असेच दिसते. हीच गोष्ट जैन धर्मालाही लागू आहे. या गोष्टीची दखल डॉ. मुरंजन यांनी घेतली नाही. बौद्ध भिक्षू व जैन श्रमण हे धर्माची ध्वजा घेऊन गृहस्थी व्यवहारात शिरले नाहीत. तसा त्यांनी प्रयत्न केला नाही. जातीजातींच्या भिन्न भिन्न धार्मिक आचारांत त्यांनी हस्तक्षेप करून एकीकरणाचे आंदोलन केले नाही. संकुचित अशा जातीय व उपजातीय धार्मिक श्रद्धा व धार्मिक आचारविचार यांचे निर्मूलन करण्याचा ख्रिस्ती किंवा मुसलमानी धर्माने जसा बऱ्याच अंशी यशस्वी प्रयत्न केला तसा त्यांनी केली नाही. ब्राह्मण पुरोहित-वर्ग किंवा ब्राह्मण नसलेला पुरोहितवर्ग हाच जातीउपजातींचा धार्मिक विधिनिषेधांचा प्रशासक म्हणून राहिला. असे गेल्या २५०० वर्षांचा भारताचा इतिहास सांगतो. शैव व वैष्णव हे दोन धर्म जातिभेद व वर्णभेद न मानणारे व धार्मिक समानतेचा पुरस्कार करणारे असूनही जातिसंस्थेची तिखट धार बोथट करण्यात अयशस्वी ठरले. एवढेच नव्हे, तर ब्राह्मण पुरोहित वर्गाने ह्यातील एकेश्वरवादी तत्त्वज्ञान आणि वैराग्य, योग व भक्ति या तिन्ही अंगांचा स्वीकार करून शैव व वैष्णव धर्मसंस्थेतही आपले प्रभुत्व स्थापन केले. बौद्ध, जैन, शैव व वैष्णव हे सर्व समानतावादी धर्म जातिसंस्थेस पराभूत करू शकले नाहीत. हे इतिहासातील नीट न उलगडलेले कोडे आहे. केवळ ब्राह्मण पुरोहित वर्गाचे वर्चस्व या कोड्याचा उलगडा करू शकत नाही. जबरदस्त राज्यसंस्था किंवा साम्राज्ये भारतात अनेक होऊन गेली परंतु राज्यकर्त्यांनी जैन, बौद्धादी अवैदिक धर्मसंस्थांना जसा पाठिंबा दिला तसा हिंदूंच्या ब्राह्मणी धर्मालाही दिला. ब्राह्मण आणि श्रमण हे दोन्हीही पूजनीय मानावेत असे सम्राट अशोकाच्या आदेशातही म्हटले आहे. बौद्ध धर्माचे सार ग्रथित करण्याच्या दृष्टीने धम्मपदामधेदेखील शेवटचा वर्ग 'खरा ब्राह्मण कोणता' याचे विवरण करणारा आहे.

राज्यकर्त्यांचा ब्राह्मणवर्गाशी अनेक वेळा झालेला झगडा इतिहासात निर्दिष्ट आहे परंतु हा झगडा दीर्घ काळ सोक्षमोक्ष होईपर्यंत कधीच चालला नाही. याचे कारण राज्यकर्त्यांची सत्ता स्थिर करण्यामध्ये हितसंबंध गुंतलेले होते. ब्राह्मण-पुरोहितवर्गाने अवैदिक अशा जातीजमातींच्या धार्मिक संस्थांना मान्यता देऊन त्या संस्थांमध्ये आपले स्थान बळकट केले; आदराचे स्थान

निर्माण केले. त्यामुळे राज्यकर्त्यांचा हस्तक म्हणून हा वर्ग काम करीत राहिला. पवित्र मानलेल्या संकुचित चालीरीती आणि उच्चवर्गीय जाती-जमातींच्या लहानलहान सामाजिक संघटित गटांचा आपले वैशिष्टय कायम राखण्याचा हट्ट यांच्यामध्ये एक प्रकारची सुसंगती होती. त्यांचेच अनुकरण अपरिहार्यपणे खालच्या जातीजमातींना करणे भाग पडले. त्यामुळे राज्याच्या स्थिरतेला महत्त्व देणारा सत्ताधारी वर्गही ब्राह्मणाचा आधारस्तंभ बनला. उच्च समता-प्रधान धर्माची शक्ती संकुचित अंधश्रद्धेवर आधारलेले अपधर्म निःसत्त्व बनण्याच्या प्रक्रियेला जशी मिळावी तशी मिळाली नाही. ख्रिश्चन व मुसलमान धर्मांना अशी शक्ती मिळाली. परंतु त्यातूनही ख्रिश्चन व मुसलमान जगातही काही प्रमाणात अपधर्म तगून राहिले. भारतात तर समतावादी धर्माच्या वरपांगी प्रभावाखाली, अपधर्माची शक्ती अधिक वाढली.

मानवशास्त्रज्ञांनी जगातील सर्व राष्ट्रांच्या व आदिमसमाजांच्या धर्मांचा अभ्यास करून असा निष्कर्ष काढला आहे की मानवाच्या इतिहासात कसल्या तरी प्रकारचा धर्म नाही असा समाजच आढळत नाही. पावित्र्याच्या व अपावित्र्याच्या कल्पना सर्व ऐतिहासिक समाजांमध्ये दृढमूल झालेल्या दिसतात. धर्म नाही असा एकही समाज इतिहासात व वर्तमानकाळात दिसत नाही. भारतातील जातीजमातींचे पृथकत्व आणि उच्चनीच भाव हाही मुख्यतः भिन्न अशा पवित्र-अपवित्रतेच्या कल्पनांवर आधारलेला आहे हे सांगणे नको. एका जातीची किंवा पोटजातीची पावित्र्यापावित्र्याची कल्पना अन्य जातीच्या वा पोटजातीच्या पावित्र्यापावित्र्याची कल्पना भिन्न असते. जी जात किंवा पोटजात स्वतः उच्च समजते तिच्या दृष्टीने खालच्या समजलेल्या जातीच्या चाली-रीतींना ती अपवित्र समजते.

अपावित्र्याचे भय हा जातिभेदाचा व उच्चनीचतेचा धार्मिक गाभा आहे. अपावित्र्याचे भय म्हणजे पापाचे भय होय. हे पावित्र्य आणि अपावित्र्य शुद्ध नैतिक कल्पनांवर किंवा एकेश्वरी भक्तीच्या तत्त्वांवर आधारलेले नसते. त्याची बौद्धिक कारणमीमांसा सांगता येत नाही. तिचा आधार केवळ अंधश्रद्धा असते. एका जातीचे अन्नोदक दुसऱ्या जातीला अपवित्र वाटते याचे मुख्य कारण म्हणजे पवित्र मानलेल्या व अपवित्र मानलेल्या चालीरीती प्रत्येक जातीच्या निराळ्या असतात, हे होय. एका जातीला जे पवित्र ते दुसऱ्या जातीला अपवित्र व एका जातीला अपवित्र ते दुसऱ्या जातीला पवित्र असेही अनेक चालीरीतींवरून दिसते. उदा० उत्तर हिंदुस्थानातील बंगाली, मैथिली, पंजाबी किंवा काश्मीरी

ब्राह्मण मत्स्याहारी किंवा मांसाहारी आहेत. श्राद्ध व देवतांचे आराधन करताना मत्स्य किंवा मांस यांचा नैवेद्य मांसाहारी किंवा मत्स्याहारी ब्राह्मण पवित्र मानतात. दक्षिणी ब्राह्मण मत्स्य व मांस सर्वथा निषिद्ध मानतात. ज्या ब्राह्मण पोटजातींमध्ये परस्पर विवाह होत नाही परंतु आहार व कर्मकांड सामान्यपणे सारखे असते त्यांचा परस्परामधील विवाहनिषेध हा भिन्न कुलाचारांमुळे निर्माण झाला आहे. एका ब्राह्मण पोटजातीतून दुसऱ्या ब्राह्मण पोटजातीत कन्या गेली तर तिचा मूळचा पवित्र आचार शिल्लक राहणार नाही व त्यामुळे देवतेचा कोप होईल किंवा पाप लागेल अशी विवाहनिर्बंधाच्या मुळाशी भीती असते. आर्थिक व्यवसायांमध्येही उच्चनीच पावित्र्यापावित्र्याची कल्पना चातुर्वर्ण्यव्यवस्थेत मुख्य म्हणून गृहीत धरली आहे. त्यामुळेच असवर्ण विवाह निंद्य किंवा निषिद्ध मानला आहे.

ब्राह्मण पुरोहितवर्ग हा विधिनिषेध, पापपुण्य आणि पावित्र्य– अपावित्र्य यांच्या सर्व जातींच्या मर्यादा राखणारा वर्ग होय. कारण पारलौकिक विचारांचा तो मुख्य प्रवक्ता होय. व्यवसायांच्या पावित्र्यापावित्र्याच्या तारतम्यपूर्ण कल्पनेने जातिसंस्थेतील उच्चनीच भाव दृढ झाला आहे. सामाजिक वर्गीय पिळवणुकीचे तंत्र मोठ्या खुबीने या अपवित्रतेच्या भयाखाली नीटपणे ब्राह्मणांनी जपून ठेवले आहे. परंतु याला सर्वस्वी जबाबदार ब्राह्मण नाही. प्रत्येक जातीजमातींच्या अंधश्रद्धा आणि उच्चवर्गीय राजकीय सत्ता ही जबाबदार आहे. ही राजकीय सत्ता कमीजास्त प्रमाणात समाजातील उच्च व्यवसायी जमातींनी आणि वर्गांनी सुद्धा पक्की ठेवण्याचा प्रयत्न हजारो वर्षे केला आहे. म्हणूनच राजाचे कर्तव्य धर्मरक्षण हे हिंदुधर्मशास्त्राने मानले आहे. म्हणूनच जातीजमातींचे रूढी व पवित्र आचार बदलण्याचा म्हणजेच धर्मात हस्तक्षेप करण्याचा अधिकार राज्यसंस्थेने हाती घेण्याचा विशेषतः प्रयत्न कधीच केला नाही; व्यावहारिक जुजबी कायदेच काही प्रमाणात राजा बदलू शकत असे. सर्व जातीजमातींचा समान व्यावहारिक कायदा अशी कल्पना हिंदूंच्या राज्यशास्त्रात केव्हाही अंतर्भूत केलेली दिसत नाही. व्यावहारिक कायदे व राज्याचे व्यवहार सांगणारी कौटिल्यादि अर्थशास्त्रेसुद्धा वर्णाश्रमधर्माचे परिपालन हेच राजाचे मुख्य कर्तव्य मानतात.

ब्राह्मणांचे व क्षत्रियांचे म्हणजे पुरोहितांचे व सत्ताधाऱ्यांचे व्यवसाय हे धर्मशास्त्राने व राज्यशास्त्राने अधिक पवित्र व उच्च मानले आहेत. बाकीचे सर्व आर्थिक व्यवसाय हे पुरोहित व राजकीय व्यवसायांपेक्षा हीन मानले व

हस्तव्यवसाय सर्वात अपवित्र मानले. शारीरश्रमावर आधारलेल्या कारागिरीच्या व्यवसायाना शूद्रांचे व्यवसाय ठरविले व त्यामुळे चार वर्णात शूद्र सर्वात अपवित्र ठरविला. शारीरश्रमावर आधारलेल्या व्यवसायांचे म्हणजे एका परी शारीरश्रमाचे अपावित्र्य व अप्रतिष्ठा हिंदूच्या मनात खिळून बसली. मळाशी व मृत प्राण्याशी संबंध येतो असे अत्यंत उपयुक्त सामाजिक व्यवसाय पापिष्ठ ठरविले. अपवित्र व्यवसाय टाकून अधिक पवित्र व्यवसाय स्वीकारण्यास बंदी घालून असा व्यवसाय बदलणे दंडनीय ठरविले. त्यामुळे व्यक्तिस्वातंत्र्य व सामाजिक स्वातंत्र्य नष्ट झाले. त्यामुळे व्यक्तिविकासाचा व सामाजिक परिवर्तनाचा मार्ग कायमचा बंद झाला. गावातील मृतप्राणी गावाबाहेर नेणे, गावातील मळ उपसणे, चामडे कमविणे, चामड्याच्या उपयुक्त व सुंदर वस्तु बनविणे, बोरखंडे तयार करणे इत्यादी व्यवसाय करणाऱ्या जमाती अत्यंत अस्पृश्य ठरल्या. एवंच शारीरश्रमाच्या अपावित्र्याची कल्पना हिंदू समाजात दृढ झाल्यामुळे हिंदू समाजाची अर्थव्यवस्था अवनत स्थितीत राहिली. कारण त्या त्या जातीच्या व्यवसायाला संरक्षण मिळाले परंतु व्यावसायिकांमधील निरोगीस्पर्धा राहिली नाही; आणि विविध शिल्पे व कलात्मक व्यवसाय यांना लागणाऱ्या शारीरिक श्रमांना हीन ठरविले. अर्थव्यवस्था प्रगतिशील न राहिल्यामुळे राज्यसंस्था कायम दुबळी राहिली. त्यामुळे परकीय आक्रमणांना भारत अनेकदा बळी पडला.

शारीरिक परिश्रमावर व विद्यांवर आधारलेले बौद्धिक व्यवसाय हे शूद्राचे व्यवसाय हिंदुधर्मशास्त्राने मानले. उदा० सोनार, धातुशोधक व धातूंचे ओतकाम करणारे, कासार, तांबट, कोष्टी, रंगारी, चितारी, सुतार, मणिकार, काचकाम करणारे, हत्यारे बनविणारे, रेशीमकाम करणारे, रत्नांना शोके पाडणारे, मालाकार, टांकसाळवाले, धातुकाम करणारे घडशी, कुंभार, लोहार, चर्मकार किंवा चांभार, जिनगर, बुरूड, मद्यकार किंवा कलाल, शंखशिंपल्यांवर काम करणारे, वाद्ये निर्माण करणारे, नट व नर्तक, गवयी, वाजंत्री वाजविणारे बजवय्ये व गुरव, मीठ पैदास करणारे लोणारी, पालख्या तयार करणारे डोलाकार, घोड्यांना वा हत्तींना शिक्षण देणारे व वाहन म्हणून चालविणारे मोतद्दार व माहूत, कास्तकार म्हणजे कुणबी किंवा शेतकरी, बाग बागायत करणारे माळी, शस्त्रांना धार देणारे, इमारतींचे बांधकाम करणारे वास्तुकार, मूर्तिकार, पाथरवट, तांबोळी, अत्तरे व तेले तयार करणारे, सुगंधी द्रव्ये तयार करणारे, कलाबूत तयार करणारे, नक्षी व भरतकाम करणारे, कसरतीचे विविध खेळ करून करमणूक करणारे डोंबारी वगैरे, राजदरबारात व ग्रामीण समाजात

नाच, तमाशा, इत्यादी प्रकारची करमणूक करून लोकरंजन करणारे, पोवाडे व लावण्या रचून गाणारे शाहीर, घोंगड्या, शाली इत्यादी लोकरीचे विणकाम करणारे, शूद्र व अतिशूद्र म्हणून समाजाच्या खालच्या थरात, दडपून टाकले. त्यांच्यावर व्याजाचा दर त्रैवर्णिकांपेक्षा दुप्पट, तिप्पट किंवा चौपट कायद्याने लादला गेला. त्यामुळे अर्थोत्पादनावर फार वाईट परिणाम झाला. ह्या जाती व वर्ग कायम खचत राहिले. परंतु समाजोपयुक्त कामे ते करीत राहिल्याने हीन जीवनमान सोसूनही ते ब्रिटिश येईपर्यंत कसेबसे तगून राहिले. कुटीरोद्योगी जीवनाची हजारो वर्षांची ही कर्मकथा आहे; ही भारताच्या आर्थिक इतिहासाने सविस्तर नोंदलेली नाही. आता वैज्ञानिक व तांत्रिकी उद्योगाच्या आधुनिक युगात त्यासंबंधाचे बरेचसे पुरावेही मिळणे कठीण झाले आहे. परंतु अजून या कुटिरोद्योगी जमाती हयात आहेत. त्यामुळे या इतिहासाची मांडणी करण्यास उपयुक्त असलेली साधने मिळू शकतात.

आर्थिक व सामाजिक दृष्टया बहुजनसमाज अजूनही खचलेला व विपन्न अवस्थेत जगत असलेला दिसतो. जातिसंस्थेची पकड अजून पक्की आहे. या जातिसंस्थेला अपावित्र्याची भीती दाखवून पुरोहितवर्गाने हजारो वर्षे दृढ केले आहे. डॉ. मुरंजन यांच्या या पुरोहितवर्गीय वर्चस्वाच्या हृदयविदारक समालोचनाने या विषयाकडे विचारवंतांचे लक्ष खेचले जाईल अशी आशा आहे. परंपरागत जीवनमूल्यांचे पुनर्मूल्यमापन करण्याचे एक चांगले साधन या पुस्तकाच्या रूपाने त्यांनी निर्मिले आहे. पुनर्मूल्यमापनाशिवाय भारतातील समाजप्रबोधनाचे आंदोलन यशस्वी होऊ शकणार नाही. राष्ट्रीय एकात्मता गेल्या शतकातील राजकीय आंदोलनाने निर्माण झाली आहे यात शंका नाही; परंतु या एकात्मतेचा पाया मात्र फार कच्चा आहे. परंपरागत मूल्यांची प्रखर समीक्षा केल्यानेच राष्ट्रीय एकात्मतेला खरेखुरे वैचारिक सामर्थ्य लाभू शकेल.









श्री. रा. ना. चव्हाण

# लोकहितवादी-फुले (उत्तरार्ध).

## लोकहितवादींच्या समदृष्टीची साक्ष

म. फुले यांच्या निधनानंतर त्यांच्या काही मित्रमंडळींनी शेतकरी-मजूर-कारागीर या लोकांची दुःखे सरकार व जनता याना समजावीत व त्यांचे निवारण व्हावे म्हणून "दीनबंधू सार्वजनिक सभा" बरेच वर्षे चालविली होती. या महत्त्वाच्या प्रातिनिधिक शेतकरी सभेने लोकहितवादींच्या निधनाने, जी त्यांची हानी झाली, त्याबद्दल पुढील पत्र लोकहितवादींच्या चिरंजीवाना पाठविले होते. त्यातील मुख्य भाग :– " रा. ब. हे जातीचे ब्राह्मण असून त्यांच्या मनात ब्राह्मण व ब्राह्मणेतर हा भेद मुळीच नव्हता. ब्राह्मणज्ञातीमध्ये यानीच इंग्रजी शिकविण्यास उत्तेजन दिले आणि जी लोकोपयोगी व सार्वजनिक कामे केली त्यांची सविस्तर हकीगत दिल्यास पुष्कळ विस्तार होईल...बरीच पत्रे निःपक्षपात बुद्धीने लिहून आपल्या ज्ञातीस ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला...... रा. ब. हे आमच्या फरी ( दीनबंधू ) स्कुलात नेहमी येऊन मुलांची परीक्षाही घेत असत; व त्या शाळेस द्रव्यद्वारा मदतही करीत. त्यांच्याविषयी आमच्या दीनबंधू सार्वजनिक सभेच्या मंडळींचे मनांत अगदी पूज्यबुद्धी आहे. ...... रावा पासून रंकापर्यंत त्यांची समदृष्टी होती."

लोकहितवादींनी मराठे लोकांच्या सभा, त्यानी चालविलेल्या 'दीनबंधू फरी स्कूल' वगैरे विद्याप्रसारक संस्था व चळवळी यामधून न्या. मू. रानडे यांच्याप्रमाणेच जनतासंबंध साधून वेळोवेळा भाग घेतला होता. वर्गण्या दिल्या होत्या. म. फुल्यांच्या मुलींच्या शाळेशीही ते याप्रमाणेच निगडित होते; व "कृतज्ञतेने धन्योद्गार" वरीलप्रमाणे व्यक्त केल्याचे अनेक दाखले सापडतात. दुर्दैव हे की, पुढील पिढ्याना यासंबंधीची फारशी माहिती नाही; व लोकहितवादींच्या या जनताभिमुख विधायक कामगिरींचा त्यांचा चरित्रकारानीही विस्तृत व ठळक आढावा उपेक्षितच ठेविला. या माहितीची उपेक्षा म्हणजे त्यांच्या व्यापक दृष्टीची उपेक्षा होय.

अनुक्रमणिका

लोकहितवादी व ' दक्षिणाफंड '

लोकहितवादी व फुले ह्याना आपआपले समाज सुधारावेत म्हणून विलक्षण काळजी होती- देशोन्नती व राष्ट्रीय पुनरुत्थान हे उद्देश त्यांच्या स्वसमाजसुधारणुकींच्या विचारामागे व प्रयत्नांच्या मुळाशी होते. दक्षिणा फंडाच्या विनिमयात लोकहितवादीनी परिवर्तन घडवून आणिले. या परिवर्तनाचा उद्देश मोठा व्यापक वाटतो. सन १८५९ साली गोपाळ हरी पुण्यास ' सेकंड क्लार्क ' होते. त्यांचा पगार ऐंशी रुपये यावेळी होता. दक्षिणा फंडात बचत करून ती रक्कम विद्याखात्याकडे लावावी हा मूळ विचार लोकहितवादींचा ठरतो. पुण्यास जर परमहंस सभेचे काम चालू केले तर सनातनी लोकांचा फार विरोध होईल. अशी कल्पना, रावसाहेब भवाळकर व दादोबा पांडुरंग या दोघानाही होती. पण पुण्यास विद्याप्रचार व्हावा म्हणून दादोबांची तीव्र इच्छा होती. दक्षिणा फंडात तीन हजार रुपये त्यावेळी पडून होते. त्यापैकी व्याकरण, न्याय, अलंकार, धर्मशास्त्र आणि वैद्यशास्त्र या सहा शास्त्रात शास्त्री लोकांच्या परीक्षा घेऊन मगच त्याना द्यावेत. येथे लोकहितवादीनी लायकी ( पात्रता ) हा नवा कस अशाप्रमाणे सुचविला. मराठी भाषेत नवीन किंवा उपयुक्त ग्रंथ, किंवा इंग्रजी, फारशी, संस्कृत भाषेतील ग्रंथांची भाषांतरे या कामी निम्मा तरी फंड उपयोगात यावा ही कल्पना ग्रंथद्वारे विद्यावृद्धीसाठी, खुद्द लोकहितवादी यानी भवाळकर वगैरे मंडळीपुढे मांडिली. ह्या अर्जामुळे पुण्यात फारच खळबळ माजली; व ग्रामण्य उभारण्यात आले. सरकारात गव्हर्नरकडे पाठविलेल्या अर्जावर एकूण ३९ सह्या होत्या. विष्णु नृसिह जोशी, नागो गोविंद आपटे आणि सितारामशास्त्री मराठे या त्रिवर्गाच्या सह्या देखील होत्या...... कारण हे परमहंस मंडळीतील होते. ( कै. भवाळकरांचे आत्मवृत्त पृष्ठांक १०६).

हे जरी त्रिवर्ग परमहंस सभेत होते तरी गोपाळ हरी व जोतीबा गोविंद हे दोघे प्रसिद्ध सुधारक नव्हतेच असे म्हणता यावयाचे नाही. या दोघांच्या सार्वजनिक जीवनांचे तात्त्विक मूळ म्हणजे परमहंस सभेचे धर्मनिर्णय होत. जोतिबा फुल्यांच्या " सार्वजनिक सत्यधर्म " ह्या अंतिम व उन्नत धर्म पुस्तकात, त्यानी अर्थात त्यांच्या सामाजिक जरूरीप्रमाणे व स्वदृष्टीतून परमहंस धर्मच हा ' सत्यधर्म ' म्हणून वेगळ्या उद्देशासाठी मांडिला आहे.

कै. श्री. भवाळकर व गोपाळ हरी वगैरेवर जे वरील जोरदार ग्रामण्य निर्माण झाले त्याचा परिहार करण्यासाठी जोतीबा फुलें यांचे साहय घ्यावे लागले. कारण ज्यानी अर्जावर सह्या केल्या होत्या त्याना ग्रामण्याच्या बहिष्काराच्या

भीतीने, सह्या करणारे आम्हीच आहोत, असे सांगण्याचे धैर्य नव्हते. फक्त भवाळकर बहिष्काराचे दुःख सहन करण्यास तयार होते. बाकीचे सह्या देऊनही लटपटले!

## जोतीबा कोण होते?

हे ग्रामण्य व सनातन्यांची प्रतिक्रिया फक्त ब्राह्मणाब्राह्मणामधीलच होती असा लघु विचार जोतीरावानी केला नाही. सर्व हिंदु एक झाले आहेत, असे त्यानी दाखविले. जोतीराव वस्ताद-पहिलवान व कुस्तीगीर होते. त्यांच्याजवळ मांग, महार, चांभार, रामोशी वगैरे दांडपट्टा खेळणारे दोनशे लोक नेहमी खडे असत. पुण्यास गुलटेकडीच्या मैदानावर या तरुणांचे त्या काळात मर्दानी खेळ चालत; व पुष्कळ लोक पाहाण्यास येत. याप्रमाणे जोतीराव प्रथमपासूनच संघ निर्माते, संघनायक-पुढारी प्रसिद्धपणे होते. न्या. रानडे-भांडारकर यानाही लोकहितवादीनी पाया तयार करून दिला. कारण लोकहितवादी देखील फुल्यांच्याप्रमाणे पहिले सार्वजनिक कार्यकर्ते होते. म. फुले गंजपेठेत अतिशय मागसलेल्या विभागात राहात असत. पुढे लोकहितवादीना बढती मिळून पुणे सोडावे लागले; तरी लोकहितवादी पुण्याच्या सार्वजनिक कार्यात व संस्थामधून संधी मिळेल तितके सहभागी होत. लोकहितवादी फुल्यांचे चहाते होते. लालशंकर उमियाशंकर, तुकाराम तात्या, वासुदेव बाबाजी नवरंगे व मामा परमानंद याना फुले जास्ती समजले. सुधारकांचे 'प्रपितामह' असे म. फुल्याना म्हणता येते याचे कारण, मुलींच्या शाळा, अस्पृश्यांच्या स्वदेशी शाळा, पहिला पुर्नविवाह, (गोखले बाग पुणे येथे सन १८६० ता. ८ मार्च) व दक्षिणा फंडाच्या विनियोगाची लोकहितवादीप्रणीत नवी चळवळ, दयानंदांची पुण्यात गाजलेली मिरवणूक वगैरे अनेक प्रसंगी जोतीबांचे लोकहितवादी-रानडे वगैरे अनेक सुधारकानी घेतलेले साह्य व त्यानी दिलेले संरक्षण असे अनेक प्रसंग पाहिल्यास जोतीबा सुधारकाना आदर्श झाले; व कृतीच्या स्पर्धेत त्यानी पहिला क्रमांक पटकाविला-नंतर कोल्हापूर प्रकरणात लो. टिळक आगरकरांना जामीन मिळवून देण्याच्या कामी जोतीराव ऐनवेळी पुढे झाले.

दक्षिणा फंडाबाबत लोकहितवादी प्रभृतीना 'पाखंडी', नास्तिक, चांडाळ; धर्मबुडवे वगैरे शेलकी विशेषणे लावून मिरवणुकीने त्यांचा जाहीर निषेध झाला. अर्थात जोतीबा पुढे झाले : "वरील अर्ज मीच (म्हणजे स्वतः जोतीबानी) केला." असे सांगण्यास त्यानी अर्जदाराना कबूली दिली. "तुळशीबागेचे दरवाजापावेतो जोतीबाची टोळी आमच्या रक्षणार्थ आली. आणि

अनुक्रमणिका

तेथे बाहेर बाजूने बसून राहिली. " कै. भवाळकरानी नंतर अर्ज इंग्रजीत जोतीबाने लिहिला, असे जमलेल्या समस्त धर्ममार्तंडाना सांगितले. व ग्रामण्यातील हवा निघून गेली. भवाळकरांचे आत्मचरित्र अर्धवट राहिल्याने पुढील अधिक इतिहास उपलब्ध होण्याचा मार्ग खुंटला! पण लोकहितवादी व फुले यांची परस्पर प्रथम केवढी घष्टण व प्रेम आणि सहकार्य होते, याची मात्र जिवंत साक्ष लाभते.

जोतीरावानी त्यांच्या गुलामगिरी वगैरे अनेक पुस्तकात आडवे-तिडवे लिहिलेले वाचूनच त्यांची योग्यता ठरविणे फारसे ठीक नव्हे. त्यांची प्रत्येक कृती मुख्यत: अभ्यासली पाहिजे. सर्व जाती-सर्वधर्म व सर्व थरातील मित्र कायमचे संग्रहीत करणे, त्यांना संकटात साह्य देण्यास प्राणपणाने पुढे होणे; हा जोतीरावात मोठा गुण होता. कोल्हापूर प्रकरणी बर्वे केसच्यावेळी देखील लो. टिळक-आगरकरांना जामिनकीचे साह्य मिळवून देण्यात जोतीबा पुढे झाले. जोतीबा मोठे कुस्तीप्रिय खिलाडू, (Sportsman), शाहीर, कवी व प्रेमळ होते. त्यांच्या ठायी आर्जव, अदबी, वगैरे नेतृत्व करण्यास लागणारे सर्व गुण होते. म्हणून त्यांचे चरित्र लोकविलक्षण-अलौकिक ठरले. म. फुले-लोकहितवादीनी आगरकर-कर्वे वगैरेना पाया तयार करून ठेविला होता. सन १८५७ सालापूर्वी पुण्यात सुधारणुकीची कामे सुरू करणे म्हणजे प्राणसंकटाना आमंत्रण देणे होय. पुण्यातील परिस्थिती कै. श्री. भवाळकर यानी वर्णन केलेली अभ्यासकानी वाचावी, इतकी महत्त्वाची आहे. दक्षिणाफंड ग्रंथोत्तेजन व शिक्षणप्रसार या कामी खर्च होऊ लागला; व महाराष्ट्रातील आधुनिक नव्या शिक्षणप्रसाराला गती प्राप्त झाली. अर्थात कित्येक युरोपिअन शिक्षणाधिकारी यांचेही साहच झाले. हे नव्या सामाजिक क्रांतीचे पहिले पाऊल होते; व यात " लोकहितवादी व फुले " यांचा सिंहाचा वाटा होता.

मुंबई-पुणे वगैरे ठिकाणची परमहंस सभा ही " गुप्त सभा " म्हणून ओळखली जाते व तिच्या सभासदानी प्रगटपणे कार्य चालविले नाही, याची सामाजिक-धार्मिक कारणे न पाहता या पहिल्या सुधारक मंडळीना पुष्कळानी अधिकपणे दोषी ठरविले आहे. असे करणे म्हणजे त्यावेळच्या इंग्रजी शिक्षण घेतलैल्यांची घरची समाजातील परिस्थिती दृष्टिआड करणे होय. जे इंग्रजी शिक्षण घेते झाले, त्यानाच लोक प्रथम सुधारक म्हणू लागले. कारण इंग्रजी नवे शिक्षण घेणे हीदेखील सुधारणा होती. व कालप्राप्त असे अटळ परिवर्तन होते, पुण्यात यावेळी नवे आलेले मिशनरी, पाद्री, व ख्रिस्ती उपदेशक हिंदूधर्माच्या

देवदेवता, चालीरीती वगैरेवर आघात करीत; व सनातनी मंडळी त्यांना मारहाण करण्यास कमी करीत नसत. मिशनऱ्यांवर एकदा फार मोठा बाका प्रसंग आला. व जोतीरावांच्या मदतीमुळे ते शाबूत राहिले! रामोशी-मांग-महार-वगैरेंच्या मोठ्या टोळीचे जोतीराव हे 'सेनापती' असल्यामुळे व जरूर तो संच बाळगून होते, म्हणून वासुदेव बळवंतासह सर्वांनाच जोतीबांचा आश्रय उपयोगी झाला. जोतीबा तसे उंचपुरे, धिप्पाड, देखणे, शरीराने मजबूत, व प्रभावी व्यक्तित्व लाभलेले नैसर्गिक नेते होते. जोतीबांचे चरित्र, पूर्ववृत्त, कार्य व विचार हा मोठा लोकविलक्षण चमत्कार आहे. त्यांना दिलेल्या "महात्मा" पदवीचा उल्लेख त्यांच्या हयातीत, त्यांच्या मागे सन १९२५ पर्यंत तरी इतरानी केलेला आढळत नाही. फुले पुतळा प्रकरण दुतर्फी गाजले; मरणोत्तर देखील जोतीबानी निंदा-स्तुती पचविली. व ह्या संघर्षातून जोतीबा महाराष्ट्राचे अपेक्षित सुधारक सिद्ध झाले. महात्मा गांधी, विठ्ठल रामजी, डॉ. आंबेडकर व पुढे 'केसरी' वगैरे सर्व नियतकालिके त्यांचा महात्मा म्हणून उल्लेख करू लागली व आता वाद उरला नाही. ज्योतिबांनी "अग्निपरीक्षा" जिवंतपणी व मरणोत्तर देखील करून घेतली. अग्निदिव्यातून-आरोप व आक्षेप यांच्या तीक्ष्ण माऱ्यातून जोतीराव महात्मा ठरले. नाहीतर तर ते "जोती गोविंद फुले" अशा सर्वसामान्य उल्लेखाने पुण्यात एक प्रसिद्ध पुरुष व सार्वजनिक कार्यात आघाडीवर असणारे झुंजार कार्यकर्ते होते. जनतेच्या प्रश्नाशी व अडीअडचणींशी त्यानी अचूक अनुसंधान साधले.

लोकहितवादी यानी स्वतःच पत्करलेल्या टोपण नावात व त्याच आडनावात त्यांचे सार्वजनिक ध्येय, लोकोद्धाराचा उद्देश, त्यांच्या साहित्यनिर्मितीचा उद्देश व विविध संस्था निर्माण करण्याचा त्यांचा मथितार्थ लक्षात येतोच. गोपाळ हरी देशमूख हे फक्त गोपाळ हरी नव्हते. तर लोकहितवाद मांडणारे झुंजार प्रवक्ते होते. पोटार्थी-धंदेवाईक वाङ्मयोपासक नव्हते. तर देशधर्म बुद्धीने त्यानी लिहिले. म्हणून जिवंत साहित्याखाली त्यांची शतपत्रे निर्देशिली जातात. जोतीरावांच्या व्याकरण-भाषा वगैरे तत्सम बाह्य बाबी ज्याना अयोग्य वाटतील त्यानी तसलेच कित्येक विचार (राममोहन, दादोबा पांडुरंग व केशवचंद्र सेन वाचले, किंवा) फक्त लोकहितवादी देखील वाचले, तरी त्यांच्या एकट्याच्या लेखनात जोतीरावांचा सर्व आशय आढळतो. मात्र स्वतंत्र सत्यशोधक समाज काढून संग्राम करावयाचा व त्या द्वारा ब्राह्मणेतरांचा पक्ष बांधावयाचा हा विचार-आचार महात्मा फुल्यामध्येच आढळतो. येथे ते वेगळे होतात. विग्रह घेतात. तरी मैत्री व वरिष्ठस्तरातील लोकाबरोबरचा सत्संग, सहवास आणि










व्यवहारात नम्रता सोडीत नाहीत. त्याना सभासद होण्याचीही सक्रिय मोकळीक ठेवतात. व त्याप्रमाणे वरिष्ठवर्गीय कित्येक सभासद झाले व होतील. जातिभेदातीत व सर्वसंग्राहक भूमिका घेण्याचा पवित्रा हल्लीच्या जोतीबांच्या नव्या चहात्यांना जमत नाही. पण जमला पाहिजे; नाहीतर शोकांतिका ठरेल. जोतीबांच्या काळात लो. टिळक व राष्ट्रीय सभा प्रथम मवाळ– नेमस्त व प्रागतिक होती. म. ज्योतिबा कोण होते ? त्यांचा स्वभाव कसा होता, त्यांच्यावर व लोकहितवादीवर निबंधमालाकाराने शब्दशस्त्रे का चालविली ? त्यातील ग्राह्य आणि अग्राह्य असा दोन्ही भाग विचारात घेतला पाहिजे. म. फुले व लोकहितवादी यांचा व्यक्तिवेध घेण्याचा प्रयत्न केला आहे. दोघांच्याही विचारांचे महत्व कमी नाही. जोतीराव त्यांच्या जातभाईकडून व भाऊबंदाकडून सारा जन्म बहिष्कृत (out caste) होते. पण ते डरले नाहीत.

## लोकहितवादींचे धर्मपर विचार

पुण्यातील पहिले सुशिक्षित बुधवारातील नेटिव्ह जनरल लायब्ररीत प्रथम जमत, पुढे हिराबागेत व्याख्याने व सभा होऊ लागल्या. लो. टिळक व मालाकर्ते चिपळूणकर पुण्यास येऊन सार्वजनिक कार्य करू लागण्याच्या अगोदर पुण्याच्या आधुनिक सार्वजनिक जीवनास लोकहितवादी–फुले वगैरे ह्यांच्या समकालीनानी सुरुवात केली होती. वैचारिक जागृतीस प्रारंभ झाला होता. "मूर्तिपूजा" ह्या सतत वादग्रस्त बनणाऱ्या विषयावर 'केसरी' निघण्यापूर्वी हिराबागेत परिसंवाद झाला होता. लोकहितवादीनी बाह्यात्कारी मूर्तिपूजेची बाजू घेऊन पुढील मुद्दा मांडिला :–" हिंदू लोकात आज जे मूर्तिबद्ध देव पूज्य मानिले आहेत, ते प्रथमतः मनुष्यामध्ये पूज्य व प्रशंसनीय मानलेल्या सद्‌गुणाच्या निदर्शक मूर्ती होत" हा मुद्दा मांडिताना लोकहितवादीनी "गणपती" ही देवता घेतली होती. [ केसरीतील निवडक निबंध पुस्तक दुसरे पान ९० ]

सत्संग व उपासना यांचाही उद्देश लोकहितवादीनी पुणे प्रार्थना समाजाच्या एका मित्र मेळाव्यात पुढीलप्रमाणे व्यक्त केल्याचे आढळले. लोकहितवादी म्हणाले, " साधारणतः ही सत्संगति असणे यात मोठा लाभ असतो तर मग परमेश्वर जो सर्व उत्तम गुणाची मूर्ति त्याचे सन्निध येणे म्हणजे किती हितकारक आहे हे सांगावयास नको. आणि उपासना म्हणजे परमेश्वराचे सन्निध येण्याचा प्रयत्न. तर उपासना करीत असणे हा सर्वांचा धर्म होय: व याशिवाय पाप व अपवित्रपणापासून दूर राहाण्यास दुसरे साधन नाही. प्राचीन काळी या देशात परकी लोकांचा रिघाव नसे आणि जमीन समृद्ध पडली ह्यामुळे स्वस्थपणा





मिळाला आणि धर्मसंबंधी जितके विचार झाले, तितके दुसऱ्या कोणत्याही देशात झालेले आढळत नाहीत. यामुळेच नाना व्रते व नाना पंथांचा प्रसार झाला. ह्यातील मुख्य प्रकार कर्मकांड, ज्ञानकांड व भक्तिमार्ग, ह्या सर्व मार्गानेच काय तो साधतो...... पूर्वी ऋषीना प्रार्थना करण्याचा फारच छंद होता, व ते हर-एक गोष्टीसाठी प्रार्थना करीत." [ सुबोधपत्रिका, मुंबई १९ मे १८७८ ]

धर्मसुधारकांचे डोळे पाश्चात्य संस्कृति व धर्म यांच्या समागमामुळे दिपले गेले होते, व ते केवळ अनुकरणशील आणि अनुनयवादी होते असे निबंधमाला-कारादि पुष्कळ विचारवंत म्हणत होते. राममोहन, दादोबा पांडुरंग, लोकहित-वादी हे वेदान्ताचेही व देशी प्राचीन संस्कृत ग्रंथांचे अभ्यासक व वेदान्ताचेही विद्यार्थी होते, ही दुसरी बाजू लक्षात घेतली गेली नाही. देशी भाषा, व्याकरण, इतिहास वगैरे ज्ञानाच्या क्षेत्रात या सर्वांची स्वतंत्र प्रज्ञा ह्या सर्वांच्या विपुल लेखनातून आजही साक्ष देते.

लोकहितवादी हे नामाभिधान उच्चारताच " शतपत्रे " पुढे उभी राहतात. म. फुले हे लोकहितवादी कसे व लोकहितवादी हे फुले कसे ? हे दाखविणे व कोणीही पाहाणे, फार फायदेशीरच आहे. या लेखाला " लोकहितवादी-फुले " असे शीर्षक दिले आहे; पण देशमुख व फुले हे दोघेही लोकहितवादी होऊन गेले. आणि दोघांच्या ठिकाणी आत्मिक महानता (महात्मेपण) आढळते. लोकसेवाबुद्धी आढळते.

## फुले-लोकहितवादींचा स्त्री-कैवार

लोकहितवादींचे नाशिक येथील भागवतांच्या वाड्यात सन १८७८ साली वादविवाद सभेत भाषण झाले. फुले-लोकहितवादी यांच्या लेखनाचे-भाषणाचे ध्येय प्रचारात्मकही आढळते. " यथा राजा तथा प्रजा " हा न्याय सर्व काळात लागू होता. पण या देशात पूर्वी स्त्रिया ह्या प्रशिक्षितही असत. हे सह- उदाहरण राममोहन व लोकहितवादी सांगत असत. पण आधुनिक काळाच्या दृष्टीने सार्वजनिक शिक्षणाचा पुरस्कार करण्याची पूर्वीची ती प्राचीन वेळ नव्हती. साता-ऱ्याचे छत्रपती प्रतापसिंह ( शेवटचे ) यानी मुलामुलीना शिक्षण देण्याचा उप-क्रम केल्याचे उल्लेख मिळतात. पण हा सन १८३९ सालापूर्वीचा प्रयत्न हा सर-दारांच्या मुलीमुलां पुरताच मर्यादित होता. " भिडयांच्या वाड्यात मुली होत्या बहुत । ब्राह्मण शेणवी प्रभु-ज्ञात ॥" असे फुल्यांच्या पुढारीपणाखाली भिडे-चिप-ळूणकर वगैरे पुण्यातील पहिल्या शिक्षितानीच चालू केलेल्या सार्वजनिक मुलींच्या

शाळेचे वर्णन एका शाहीराने, त्याच्या पोवाड्यात केलेले आहे. या प्रकारचा सार्वजनिक प्रयत्न मुंबईस याच काळात नाना शंकर शेट यानी केला. लोकहितवादी नाशिकच्या सभेत म्हणाले :– " मनुष्यप्राण्यांनी सर्वदा आपआपल्या देशात विद्याधन, व्यापार, यांत्रिक ज्ञान, सुधारणा इत्यादि आणवतील तेवढी आणावी व ती मिळविण्याचा सर्वांनी प्रयत्न करावा. त्यांत स्त्री पुरुष उच्चनीच हा आपपरपणा टाकून द्यावा. ईश्वराने स्त्री पुरुष ही समान जाती उत्पन्न केली असून पैकी पुरुषजाती सज्ञान व स्त्री जाती अज्ञान ही सुज्ञांच्या मते फार विरुद्ध होत व त्यामुळे एकंदर देशाचा अर्धाभाग अज्ञानावस्थेत मूर्खपणाने राहिला हे बरोबर नाही." [ सुबोध पत्रिका "- २ जून १८७८ मुंबई ]

महात्मा फुले ह्यानी देखील स्त्रियांची कैफियत-बाजू-हिरीरीने मांडली आहे. मुली व मुलगे सारख्याच योग्यतेचे व सारख्या हक्कास ( Equal Rights ) पात्र आहेत, एवढेच नव्हे तर " स्त्री " ही पुरुषापेक्षा श्रेष्ठ असे महात्मा फुले यानी उदाहरणासह पटविले आहे. [ महात्मा फुले समग्र ग्रंथ पान ३५९-६० ]

म. फुले यानी व लोकहितवादींनी फटकळपणे वस्तुस्थिती व उघडी सत्ये मांडली होती म्हणून ते अजूनही अप्रिय आहेत, व होते. खेड्यातील स्त्रियांचा अर्धाभाग फार मोठ्या प्रमाणात " निरक्षर " आहे. म्हणून " लोकहितवादी-फुले " अद्याप मार्गदर्शक आहेत. अतिशूद्रांचा व आदीवासीयांचा प्रश्न म. फुले यानी प्रकर्षानी मांडला पण ब्राह्मणेतर चळवळ ह्या दृष्टीने, खेड्यापाड्यातील लोकांचा मानीव अस्पृश्यासंबंधीचा दृष्टिकोण संपूर्ण पालटण्याच्या कामी यशस्वी झालीच नाही.

### लोकहितवादींचा तो काळ

दादोबा पांडुरंग, लोकहितवादी व फुले यांचा काळ अव्वल इंग्रजीचा व राष्ट्रीय सभेच्या पूर्वीचा होता. राष्ट्रीय सभा देखील राजकीय सुधारणा करण्यासाठी निघाली. तिचे सर्व संस्थापक पूर्ण स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते नव्हते ! लो. टिळक जहाल राजकारणाच्या क्षितिजावर येण्याच्या अगोदरचा हा काळ होता. अव्वल इंग्रजीचा काळ व उत्तर इंग्रजीचा काळ एकसारखा राहिलाच नाही ! नव्या व वेगळ्या व्यापक दृष्टीने लोकानी या दोन महाराष्ट्रीय पुरुषाकडे तात्विक दृष्टीने पाहावे, म्हणूनही हा एवढा विचारप्रपंच केला आहे.

आर्यसमाज हा भारताच्या सर्व प्रांतातून हल्लीही आढळतो; व आर्यसमाजाच्या इतिहासात लोकहितवादींचे उल्लेख वारंवार सापडतात. त्याचप्रमाणे

ब्राह्मसमाजमंदिरे भारतात सर्व प्रांतात आहेत. फार काय पाकिस्तान ( पूर्व ) मध्ये ती फार होती. कराची येथेही ब्राह्मसंदीर होते. सर्वधर्मसमभाव हा त्यांचा उद्देश न जाणता धर्मवेडचा पाकिस्तानवाल्यानी त्यांची वाट लाविली ! असो आर्यसमाज अखिल भारतीय आहे; व त्याच्या इतिहासात लोकहितवादीना निश्चित स्थान आहे. म. फुले व सत्यशोधक याना असे अखिल भारतीय स्थान प्राप्त नाही: उत्तर हिंदुस्थानात ब्राह्मणेतर सत्यशोधक चळवळींची गरजच भासली नाही. व महाराष्ट्रात बहुजनता सत्तावंत आता झाल्याने एका अर्थाने गरजच पुरी झाली !

## सद्धर्माची खूण - नीती

फुले – लोकहितवादीनी निःपक्षपात नीतीवर फार भर दिला, लोकहितवादी व फुले यानी उभयतानी सांगितलेली सद्धर्माची म्हणजे सार्वजनिक सत्यधर्माची खूण ही प्रांतिक नव्हती; ती खूण विश्वधर्मावर आधारित होती व आहे· लोकहितवादी लिहितात :– "सद्धर्माची मुख्य खूण हीच की– मनुष्याचे कल्याणाकडे चित्त असावे, परंतु मनुष्याचे कल्याण करणे, म्हणजे लुच्चे, सोदे यांचे रक्षण करणे किंवा फुकट जेवणारे लोक यांची पंगत माजविणे नव्हे. पात्रापात्र पाहून जे आहेत, त्यास शहाणे करण्याची योजना करणे; जे रोगी आहेत: त्यास औषधपाणी करणे, जे दरिद्री व पीडित आहेत त्यास सुख देणे. आईबापांचा प्रतिपाळ व मान करणे, हीच नीती आणि हेच पुण्य होय. [ लो. हि. नोव्हेंबर १९४८ पत्र क्रमांक २६ सं. श्री. अ. का. प्रियोळकर पृ. ९२ ] म. फुले यानी सार्वजनिक सत्यधर्म या त्यांच्या अंतिम उन्नत धर्मपुस्तकात जे सत्यवर्तनासंबंधी तेहतीस स्वतःचे नियम दिले आहेत त्यांचे ध्येयधोरणदेखील वरील लोकहितवादींच्या नीतिप्रधान धर्मानुष्ठानाच्या व्याख्येस फार पूरक व जुळते आणि मिळते आहे. कष्टाची-श्रमाची किंमत, योग्यता व उपयोग या संबंधाने दोघांनीही आग्रह धरिला आहे. व धर्म हा बुवाबाजीस व ऐतखाऊपणास कारणीभूत होऊ नये व धर्माने आणि देवाने शोषक बनता कामा नये, यावर दोघानीही भरपूर भर दिला. म्हणून दोघांचाही प्राणभूत वरील विचार एकच ठरतो. धर्मढोंग, ऐतकब्बूपणा, परान्नपुष्टता वगैरे धर्मातून निर्माण झालेले दोष उघडकीस आणताना तुकारामाप्रमाणे लोकहितवादी व फुले हे दोघेही ठिकठिकाणी शिवराळ बनलेले आढळतात ! दोघांचाही मारा विकृतीवर झाला. मूळ व्यापक धर्ममूल्यावर झाला नाही. दोघांचा शिवराळपणा अटळ होता. लोकांना जागे करावयाचे होते. नव्या युगाचा आरंभकाल होता, व परकीय राज्य व राजवट यांचा अर्थ सांगणे क्रमप्राप्त होते. इंग्रज आले व त्यानी त्यांचे राज्य घट्ट केले.

अनुक्रमणिका

त्याकाळात एकदम क्रांतीला हात घालता येणे शक्य नव्हते, राष्ट्रीय सभा नव्हती. सार्वजनिक सभा देखील नव्हती. जोतीरावांचा लोकसमाज तर एकदम अंधारात होता. धक्के-बुक्के-ठोसे द्यावे लागले. " यासी कोणी म्हणे निंदेची उत्तरे ॥ " निंदावे हे जन। ऐसा भागा आला भाग " या अनुभवानुसार " तीक्ष्ण उत्तरे ॥ हाती बाण घेऊन फिरे ॥" अशी स्थिती (तुकोबा प्रमाणेच) फुले-लोकहितवादीना अंगीकारावी लागली व त्यामुळे दोघेही अप्रिय व पुष्कळ काळ उपेक्षित राहिले. फार काय तुकारामालाही आर्यांग्ल विद्वानपंडित चिपळूणकर यांच्याकडून " शूद्र कवी " " घोंगड्या कवी " वगैरे वगैरे शब्दात इंग्रजी नव्या राज्यात देखील संभावना करून घ्यावी लागली. जेथे तुकोबा निंदेचे विषय झाले तेथे जोतीबांचा काय पाड ? पण आता जोतीबा व गोपाळ हरी हे सारेच विरोधाचे पर्वत ओलांडून जनतेच्या विचार प्रांगणात एकत्र खेळीमेळीने वावरू शकतील. दोघानीही निबंधमालाकारासंबंधी स्वतः ' ब्र ' काढला नाही. चिपळूणकरांच्यासंबंधी आदर व्यक्त करूनच फुले-लोकहितवादी यांचा काळ-साम्य व भेद आणि एकसारखे महत्त्व निदर्शनास यावे, एवढाच येथे व्यापक उद्देश आहे. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा, हंटर कमेटीच्या पुढे दिलेल्या लेखी साक्षीत, आदराने उल्लेख म. फुले यानी केला आहेच.

दोघानीही सत्यधर्माची खूण म्हणून ठरीव कर्मकांड-किंवा ठरीव नवेजुने भक्तिकांड (उपासना-प्रार्थना पूजा प्रकार) हेच केवळ नीति व सदाचाराचे द्योतक ठरविले नाहित. वरील सद्धर्माची खूण-व्याख्या-ही ' संध्या ' वगैरे कर्मकांडावर लिहिताना लोकहितवादीनी व्यक्त केली आहे. जोतीराव अर्थात घरीदारी एकेश्वरी (कट्टर) होते. दत्तक मुलाचे लग्न स्वतःच्या एकेश्वरी पद्धतीप्रमाणे केले. व शेवटी देहातून गमन करताना त्यानी प्रार्थनापूर्वक निर्वाण साधिले. उलट म्हातारपणी लोकहितवादी घरी देवपूजा-अर्चा करीत असत वगैरे आणखी इतर धर्म व समाजसुधारकांच्या दृष्टीतून कच त्यानी खल्ली असे प्रसंग व मुद्दे लोकहितवादीत मिळतात. पण त्यांचेच सर्वथा भांडवल करून छिद्रान्वेषीपणा सतत करणे हा महाराष्ट्राला व मराठीला मोठा शाप आहे. या शापातून आपण सर्व कसे सुटणार ? सुटण्याचा हा लेख एक प्रयत्न आहे. कोणाही माणसाची योग्यता, त्याची जन्मजात, जन्मप्राप्तधर्म व उपास्य उपासनाप्रकार किंवा नंतर आताच्या काळात त्याने स्वीकारलेला राजकीय पक्ष यावर आधारीत करणे, हे निकोप बुद्धीचे लक्षण नव्हे. महाराष्ट्रातील प्रार्थनासमाजाच्या पुढील पिढ्यातील मंडळी दयानंद फुले-लोकहितवादीना दूरचे समजू लागली, म्हणूनही त्यांच्या सहिष्णु-उदारदृष्टीला ग्रहण लागले ! धर्म व समाज

सुधारकांचे संबंधी महर्षि विठ्ठल रामजी शिंदे यांच्यात मात्र निर्विकारदृष्टी आढळली. ह्यामुळेच सदर लेखनास प्रेरणा प्राप्त झाली. कर्मवीर शिंदे यांचे मत असे होते की– सर्व नवयुगसमाजांनी व जगातीलच सर्व उदार व विश्वधर्माच्या पुरस्कर्त्या चळवळींनी एकत्र येऊन जागतिक धर्माची प्रतिष्ठा व प्रचार वाढवावा. हा विवेक लोकहितवादींत होता. कारण सर्वच नवयुगसमाजात (म्हणजे प्रार्थनासमाज, आर्यसमाज व सत्यसमाज) लोकहितवादींनी भाग घेतला व या सर्वांचे ते हितचिंतक होते. त्यांची दृष्टी सांप्रदायिक नव्हती. पक्षीय नव्हती.

## फुले–लोकहितवादींचा विवेक

'धर्म कधी बुडत नाही' असा विवेक लोकहितवादींनी त्यांच्या 'संध्या' ह्या पत्रात व्यक्त केला आहे. महात्मा फुल्यांनी देखील धर्माचे निराळ्या अर्थी दोन भाग पाडले होते. एक सार्वजनिक–सार्वत्रिक– सत्यधर्म व दुसरा आपमतलबी म्हणजे सवराती धर्म होय. सवरात– स्वार्थ– हा शाश्वत व निःपक्षपात धर्माच्या आड येतो. जो 'सार्वजनिक (universal) सत्यधर्म' म. फुल्यांनी सांगितला आहे, तो कधीच बुडणार नाही. यातील सार्वजनिक सत्ये व ब्राह्मसमाज आणि प्रार्थना समाज यांचा मूलभूत दृष्टीकोण एकसारखाच ठरतो. टीकाकार चिपळूणकर यांनी देखील या सर्वांना 'एकाच माळेचे मणी' म्हणून वारंवार गणिले आहे. उदा :– उसनी धर्मस्फूर्ति आणून नव्या धर्माच्या खटपटीस लागलेली ब्रह्मसमाज, प्रार्थनासमाज, आर्यसमाज यातील भक्त मंडळी." हल्लीच्या मानाने चिपळूणकर यांच्या काळात वरील नव–समाज व त्यांचा तो काळ अधिक भरभराटीचा, व त्यांच्या गरजेचा होता; असे म्हणावे लागते. स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा ही चिपळूणकरांची त्रिसूत्री होय. या दृष्टीनेही महात्मा फुले–लोकहितवादी यांची कार्ये व लोकसेवा झालीच. चिपळूणकर अकाली निवर्तले, व ह्यांच्या पश्चात फुले–लोकहितवादींची फार कामगिरी झाली. पुण्यास भरलेल्या पहिल्या मराठी ग्रंथकार परिषदेचे पहिलेच परिपत्रक रानडे व लोकहितवादी या दोघांच्या सहीने प्रसिद्ध झाले होते. निबंधमालाकार दीर्घायुषी झाले असते व माला चालूच राहिली असती तर त्यांना पुढे वेगळे मत व्यक्त करावे लागले असते.

प्रिन्स ड्यूक ऑफ कॅनॉट पुण्यास आल्यावर त्यांच्या दरबारात शेतकरी पोषाखात जाऊन शेतकऱ्यांची स्थिती त्यांच्यापुढे उभी करणे, पुणे म्युनिसिपल सभासद असताना एकमेव व एकाकी राहून लिटन ह्या गव्हर्नरसाहेबाच्या मानपत्राला विरोध दर्शविणे वगैरे फुले महात्मा यांची देशाभिमानी कामगिरी

जीवनाच्या द्वितियार्धात म्हणजे चिपळूणकर यांच्या निधनोत्तरच्या काळात जोतीरावांच्या हातून पार पडली. "इंग्रजी विद्या ही तर वस्तुतः पाहाता वाघिणी सारखी आहे; तिच्या दुधावर जो पोसला तो लेचा पेचा कधीच निपजू नये. उत्साह धैर्य, अश्लाध्य कर्माचा तिरस्कार, स्वावलंबन इ० उदात्त गुण वरील भाषेतील ग्रंथांच्या अध्ययनापासून उत्पन्न होणारे आहेत." (चिपळूणकरांची निबंधमाला, अंक ७८). ही विष्णुशास्त्री यांची वाणी फुले–लोकहितवादींनीच प्रथमतः खरी केली. जोतीरावांचे उपलब्ध इंग्रजी गद्य पाहता, त्याचे इंग्रजी त्यांच्या मराठी गद्यापेक्षा चांगले ओघवती वाटते. उत्साह, धैर्य, अश्लाध्य कर्माचा तिरस्कार, स्वावलंबन हे गुण म. फुले व लोकहितवादी यांच्यात आढळतात.

ज्योतिबात (डॉ. आंबेडकर यांच्याप्रमाणेच) वरिष्ठ वर्गियांबद्दल रुष्टता आढळते. लोकहितवादी यांचे धर्मसुधारणेचे धोरण वैदिक प्रामाण्याला धरून होते. म्हणजे प्राचीन काळाला नव्या धर्म व समाज सुधारणा त्याना जोडावयाच्या होत्या. ज्योतीरावानी असा अतिप्राचीन आधार, किंवा मध्ययुगीन संतांचा आधार किंवा फार काय ब्राह्मसमाजादि नवयुग समाजाशीही त्यानी प्रत्यक्ष संबंध जोडला नाही. कोळी जसा आपल्या शरीरातून धागा काढून घर तयार करतो तसे स्वतःचे विचार-आचार-घर जोतीरावानी निर्मिले !

### रानड्यांची सुधारकाची व्याख्या

तरी जोतीराव व गोपाळराव हे दोघेही सुधारकातच गणले जातात. पण तुलनेने जोतीराव क्रांतीकारक ठरतात. तरी इतर सर्वच तत्कालीन लहान मोठे सुधारक जोतीरावाना आपल्याप्रमाणेच सुधारक म्हणून मान देत होते. लोकहितवादी यांची जी मित्रमंडळी होती, तीच जोतीरावांचीही होती. उदा० दादोबा पांडुरंग, बाबा पदमनजी, रानडे, मदन श्रीकृष्ण, गोवंडे सदाशिवराव, नवरंगे परमानंद व लालशंकर उमियाशंकर वगैरे सर्व तत्समाशी या दोघांची म्हणजे फुले व देशमूख यांची एकसारखी घसटण होती. मात्र दयानंदाशी फुल्यांचे सूत जमले नाही. लोकहितवादी व दयानंद यांच्या दरम्यान पत्रव्यवहार चाले. न्या. मू. रानड्यांची सुधारक-संज्ञेची व्याख्या मोठी चित्य वाटते :–

"The true reformer has not to write upon a clean slate. His work is more often to complete the half, written sentence, we cannot break with the past altogether to be ashamed of it. But while respecting

the past we must over seek to correct the parasitical growths that have enervasted it."

जोतीरावानी स्वतःला सुधारक म्हटलेले नाही ! दयानंद हेदेखील सुधारकच ठरतात; आणि लोकहितवादीना ही व्याख्या जास्ती लागू पडते. जोतीराव वेदासंबंधी अगदीच उदासीन होते. फार काय ते वेदद्वेष्टेच होते; वेदापेक्षा त्याना बायबलच आवडे "Do unto others as you would be done by." हा असा समतावादी न्याय बायबलात त्यांना आढळला. त्यांच्या सार्वजनिक सत्यधर्म पुस्तकात या संदर्भात आधार आढळतात. लोकहितवादींची वेदनिष्ठा व अभ्यास फार मोठा होता. त्यामुळेही ते शेवटी प्रार्थनासमाजापासून बरेच दूर झाले; व यामुळे पुष्कळ जवळचा अनेकवर्षे संबंध येऊनही लोकहितवादी प्रार्थनासमाजाचे पुढारी व प्रवक्ते म्हणून समजले जात नाहीत. पुण्याच्या प्रार्थनासमाजात एरव्ही व वार्षिक उत्सवातही आरंभीची बरीच वर्षे त्यानी व्याख्याने दिली आहेत. वर्गणी वगैरे देत असत. म. फुले यांचे बरेच मित्र, साहाय्यक प्रार्थनासमाजातील होते, व फुले पुणे प्रार्थनासमाजात चुकून जात येत होते. तरी त्या मंडळीशी व प्रा० समाजाशी कर्मवीर शिंद्यांच्या प्रमाणे कधीच एकरूप झाले नाहीत. उलट प्रार्थनासमाज मुंबई व पुणे येथे निघाल्यावरही त्यानी स्वतंत्र सत्यशोधक ब्राह्मणेतरांची अशी "सत्यशोधक" हे वेगळे नाव घेऊन संघटणा बांधली. लोकहितवादी यानी असा कोणताच स्वतंत्र फड–संप्रदाय–किंवा पंथ व पक्ष निर्माण केला नाही. म. फुल्यांच्या पश्चात् त्यांची चळवळ जास्ती गरजेमुळेच फोफावली. अशा विलक्षण प्रभावाच्या दृष्टीने लोकहितवादी थिटे व एकाकी ठरतात. मात्र त्यानी रानडयांना अभिप्रेत असलेली सुधारकाची व्याख्या विचारात व व्यवहारात आणण्याचा प्रयत्न फार केला. लोकहितवादी म्हणजे "शतपत्रे" व "शतपत्रे" म्हणजे लोकहितवादी; अशी प्रसिद्धी आहे. महात्मा फुले यांचे सार्वजनिक व कौटुंबिक जीवन, त्यांच्या पुस्तकातले विचार व त्यांचे सार्वजनिक जीवन यात सुसंवाद व एकवाक्यता आढळते. म. फुले सत्यशोधक समाजाचे संस्थापक–कार्यवाहक व प्रचारक देखील होते. वैचारिक जागृति व वैचारिक क्रांति हा लेखनाचा उद्देश होता. त्यांचे जीवन स्वयंभूच जास्ती होते. 'निश्चयाचा महामेरु' असे त्यांचे वर्णन होते.

### लोकहितवादींची विसंगती व सुसंगती

लोकहितवादींचा 'लोकहितवाद' कोणास नाकारता येत नाही. त्यानी त्यांच्या मुलाला उच्च शिक्षणार्थ इंग्लंडला पाठविले. त्यात त्यांचे विद्याप्रेम

व मुलाची हुषारी दिसते. भारतीय आर्थिक व्यवहाराची चौकशी करण्यासाठी नेमलेल्या मंडळावर सरकारने नेमणूक करण्याचा स्पष्ट इरादा जाहीर केला होता; पण समुद्रपर्यटणामुळे जातिबहिष्कृत व्हावे लागेल म्हणून ते स्वतः विलायतेस गेले नाहीत. व मुलाला विलायतेस पाठविले ही चूक जातिबहिष्कृतता टाळण्यासाठी त्यानी सनातन्यापुढे कबूल केली व त्यांनी माघार घेतली, अशी विसंगती त्यांच्या देखत दाखविण्यात येत असे व नंतरही दाखविण्यात येते. नातवंडांची लग्ने सहाव्या व सातव्या वर्षी केली. न्या. मू. रानडयांच्या चरित्रामध्ये देखील प्रथम विवाहानंतर दुसऱ्या लग्नाच्या वेळी पुर्नविवाह करिता आला नाही. चहाग्रामण्य प्रकरणी प्रायश्चित्त वगैरे विसंगती आढळते. बंगालचे समाजसुधारक श्रीमान् केशवचंद्र सेन यांच्या मुलीच्या बालविवाहाचा प्रसंग तिकडे गाजला. यासारख्या प्रसंगामुळे व विसंगतीमुळे या सर्वच थोर पुरुषावर विलक्षण टीका झाली. असल्या चुकांचे समर्थनही लंगडे पडले व पडते. पण एवढयाच चुकावर व पडत्या प्रासंगिक बाजूवर लक्ष केंद्रित करून या सर्व सुधारक थोर पुरुषांची योग्यता सर्वथा गौण समजणे हे अयोग्य होय. गुणाधिक्य, कार्याधिक्य व यांच्या जीवनाचे आणि विचारांचे परिणाम पाहिले पाहिजेत. सामाजिक सुधारणेखेरीज विद्यावृद्धी, विविध सर्वांगिण संस्थांचे संस्थापन, साहित्य आणि इतर समकालीन प्रश्नावर लोकहितवादी आदि करून थोर पुरुषानी बजाविलेली कामगिरी लक्षात घेण्यातच आता चिकित्सकांच्या मनाचा थोरपणा मापला पाहिजे. दादोबा पांडुरंग व लोकहितवादी यांच्या वृद्धावस्थेत त्यानी निर्माण केलेल्या समाजसुधारणाप्रवाहाला त्यांचे वर्तन विशेष उत्तेजक नाही. दादोबांची ही पडती बाजू आत्माराम पांडुरंग यानी उचलून धरली. लोकहितवादींच्या वैचारिक सुधारणाना म. फुले यानी पुढे आचारांचे अधिष्ठान मिळवून दिले; व शतपत्रांना प्रत्यक्ष यश मिळवून दिले. स्वतः म. जोतीरावानी व त्यांच्या समकालीन कर्त्या अनुयायानी लोकहितवादींची योग्यता कमी मानिली नाही, हे विसरून, पुढील पिढयानी लोकहितवादींची उपेक्षा, करावी हे ठीक नव्हे. दादोबा पांडुरंग यांच्या प्रत्यक्ष वास्तव्याचा पुणे शहराला फारच थोडा लाभ झाला होता. तरी त्यानी प्रेरणा निर्माण केली. व लोकहितवादींच्याकडे प्रत्यक्ष लोकजागृतीचे श्रेय जाते. दक्षिणाफंड पुढे अजिबात कमी झाला; व त्याचा विनियोग शिक्षणप्रसारार्थ व ग्रंथोत्तेजनार्थ होऊ लागला. भिक्षुकांचे बिन हिशेबी महत्त्व कमी व्हावे हा जो सत्यशोधक समाजाचा व ब्राह्मणेतर चळवळींचा उद्देश होता, त्या कार्याचा "नारळ" लोकहितवादीनीच फोडला;

व शतपत्रांचे वार तयार करून म. फुल्यांच्या कार्यासाठी लोकहितवादींनी वैचारिक पाया निर्मिला.

## लोकहितवादींचे यश व थोरवी

लोकहितवादींची विसंगती लोकाकडून विसरून आज त्याना थोर समाज-सुधारकात व विवेकवंतात स्थान आहे. सर्वच त्यांचे शतपत्रातील व इतरत्रही कळकळीने व्यक्त झालेले विचार कालबाह्य झाले नाहीत. लोकहितवादींना विष्णु-शास्त्री चिपळूणकरांच्या व लोकमान्यांच्या संप्रदायात स्थान नव्हते व आजही नाही.

विसंगतीचे जे भांडवल करितात, व ज्यानी सुधारणावाद रोखावा म्हणून केले, त्यांच्यातही विसंगती होती; पुष्कळजण सनातनी-सुधारक होते. व व्यव-हारात असतात व पुष्कळ सनातनी असून पुढे सुधारणावादी झाले. आधुनिक सुधारणांची समाजाला गरज होती व म्हणून समाजाने मोठमोठ्या सुधारकातील विसंवाद व विसंगतीकडेच पाहून गतिशून्यता पत्करिली नाही. लोकहितवादी नंतर खंड न पडता आगरकर आले. आगरकरांचे आयुष्य थोडे होते. तरी त्यांचा प्रचार झंझावाती ठरला. लोकहितवादी-फुले आदिकरून सर्व समाज-सुधारकांच्या बहुतेक सुधारणाना व शिक्षणप्रसाराला आज साठ टक्के तरी यश येऊन चुकले, म्हणून लोकहितवादी व महात्मा फुले ह्यांची चरित्रे यशस्वीच झाली. मक्षिकान्यायाने अगर छिद्रान्वेशीपणाने ह्यांच्या आचार–विचारातील विसंगती शोधून तिचा विचारप्रपंच करण्यापेक्षा हंसक्षीरन्यायाने गुणग्रहण करणे यातच महाराष्ट्राचा लाभ व उन्नती आहे. लोकहितवादी यानी म. फुले यांच्याशी संपर्क साधला तसा आगरकरानी प्रत्यक्ष साधला नाही. तरी या सर्व विचारप्रवाहाशी चिपळूणकरासारखे ते मुळीच विरोधी नव्हते.

लोकहितवादींनी जे सर्व लिहीले, व्याख्याने दिली व लोकसेवापर कार्यात समबुद्धीने महाराष्ट्रात व नंतर गुजराथमध्येही असताना त्यानी जो सार्वजनिक सर्वांगीण कार्यात भाग घेतला व समाजाच्या सर्वांगीण प्रगतीला त्यानी जी गती दिली ती फार चिंत्य आहे. लोकसेवाबुद्धीने व देशप्रेमाने त्यानी जीवन व्यतीत केले. लोकपुढारी होणे हा आजकालचा सवंग हेतु किंवा लोकेषणा–वित्तेषणा ही आजकाल लोकप्रिय झालेली बाब सार्वजनिक जीवनाचे सूत्र म्हणून त्यानी कधीच अभिप्रेत धरली नव्हती. कालप्राप्त ज्या मर्यादा त्यांना पडल्या आणि खाजगीत विविध संकोच पत्करावे लागले, ह्याला धरच्या

अनुक्रमणिका





दारच्या परिस्थितीचे बंध पडले. पण त्यानी पारिवारिकतेच्या मर्यादा ओलांडून सार्वजनिक उद्धाराविषयी जी कळकळ बाळगिली तीच आजच्या काळात आदर्श होय. वैयक्तिक महत्वाकांक्षा व अमाप स्वार्थ याना उधाण येत असताना, नव्या तरुण पिढीनी व नवविद्यार्थ्यांनी, लोकहितवादींची सरस्वतीसेवा, अमाप साहित्य-प्रपंच, आणि त्यांची सोपी बालबोध मराठी गद्यशैली, व समाजजीवन बदलण्यासाठी त्यानी केलेला लेखणीचा असिधारा व अखंड वापर हा महत्त्वाचाच मानावा. जीवनाचे प्रतिबिंब साहित्यात पडते, पण लोकहितवादींच्या साहित्याचे प्रतिबिंब जीवनावर पडले व जीवनाचा ओघ पालटला. हा पालट विशेषत: महात्मा फुल्यांच्या बळकट हस्ते झाला; तरी लोकहितवादींच्या विचारसरणीला यशच लाभले.

ज्योतिरावांची जीवनसरणी प्रमुखत: अनुभवातून निर्माण झाली, तिने दुसऱ्या कोणापासून निश्चित स्फूर्ति घेतली नाही. शतपत्रात चितारलेल्या पुरोहितांच्या जीवनांचा त्याना अनुभव येत होता. व शूद्रातिशूद्र व मुलींच्या शाळा चालविताना वरिष्ठवर्गीय शिक्षकांचा जो अनुभव ( कटु ) आला. त्यातूनच म. फुले यांचा मार्ग व पक्ष वेगळा झाला. इतराशी वागताना वरिष्ठ अहंभावाने वागतात, याबद्दलचा ऊहापोह शतपत्रात लोकहितवादीनी वारंवार केला होता. फारपूर्वी तुकारामाने परमार्थक्षेत्रात इतरांची होणारी कुचंबणा दाखविली होती. व सर्वच संतानी तक्रारी मांडल्या होत्या. लोकहितवादी व फुले यानी ऐहिक–सामाजिक कुचंबणा मांडिल्या. व दोघानाही धर्मशुद्धी व प्रत्यक्ष समता पाहिजे होती. दोघेही आस्तिक्यवादी होते. पण नवे शिक्षण, नवे विज्ञान कालप्राप्त सुधारणा यांची जरूरी आणि विज्ञानाची थोरवी दोघानीही कटाक्षाने सांगितली. स्वसमाजांना उद्देशून दोघानीही लिहिले तरी या दोघांचा सुधारणावाद स्वसमाजापुरताच मर्यादित नव्हता. धर्मांतरे रोखावीत म्हणूनही लोकहितवादी दयानंदाकडे आकृष्ट झाले असावेत; व आता म. फुले यांचे बहुतेक साहित्य उपलब्ध झाले आहे. त्यावरून असे स्पष्ट होते की– ख्रिस्ती ( व मुसलमान ) धर्मात लोक का जातात ? त्यांच्या धर्माधिकाऱ्यात (मिशनरीत) कोणते गुण आहेत, व आपल्यात त्या गुणांचा कसा अभाव आहे, यासंबंधीचा छडा लाविण्याचा प्रयत्न म. जोतिबानी ठिकठिकाणी नेमका केला आहे; व प्रचलीत रुढीबद्ध हिंदु–धर्म असमर्थ का झाला, व समर्थ कसा होईल ? यासंबंधीचे मूलगामी विचार जोतीबात आहेत. बहुतेक जोतीरावांच्या विचार-ज्योतीचे बिंब–प्रतिबिंब आता उपलब्ध झाल्याने सर्वानाच पूर्वविधाने तपासावी

लागतील, अर्थात त्यांची ‘कृती’ही उक्तीप्रमाणे झाली म्हणून कृतिशील सुधारकात त्यानी पहिला नंबर पटकाविला आहे. राममोहन ते लोकहितवादी – शिंदे व आगरकरी परंपरेचे आगरकरासारखे अज्ञेयवादी– वगैरे सर्वपरिवर्तन-वाद्याना यच्चयावत सर्वच सुधारकाना अलगद बाजूस ठेवून डॉ. आंबेडकर यांच्यासारख्या अत्यंत हट्टी (सत्याग्रही) क्रियाशील शूर पंडिताने म. फुले यांनाच गुरु का मानिले? या घटणेचा खोल व व्यापक अर्थ लाविला पाहिजे. रानडे–गोखले; रानडे–भांडारकर यांच्या परंपरा येथे असताना या सर्व थोर-थोराना डावलून डॉ. आंबेडकर यानी रानडे–भांडारकर याना सोडन भलताच (?) गुरु केला. याबद्दल त्यांच्या सांप्रदायिकाना हेवा– व चमत्कार वाटणे शक्य आहे. पण कारणे कोणती? सामाजिक विविध थर होते; व त्यांच्यात परस्परात विश्वास नव्हता!

लोकहितवादी–फुले अप्रिय का होते?

इतर कोणत्याही सुधारकापेक्षा लोकहितवादींचे विचार म. फुल्याशी जुळतात म्हणून लोकहितवादी हे फुलेप्रवाहात समावेशित होऊ शकतात. इतकी मोठी वैचारिक सोयरिक– व पदर पार्श्वभूमी आणि संबंध दुसऱ्या कोणत्याही सुधारकाशी जमत नाही. लोकहितवादी गृहस्थ होते म्हणजे भिक्षुक नव्हते, यामुळे त्याना भिक्षुकावर लिहिता आले, तरी त्यानी गृहस्थ व भिक्षुक असा पूर्ण विग्रह करून सर्वच लिहिले नाही. जोतीरावांचा सर्व रोख विषमताप्रधान धर्मग्रंथावर होता; व वाद का आहे व तो केव्हा कसा पुढे रहाणार नाही, याचेही दिग्दर्शन केले आहे. शास्त्रीपंडित–भिक्षुक–पुरोहित वगैरे धर्मगुरु समजणारांच्यावर मनुस्मृती वगैरे पक्षपाती ग्रंथांचा प्रभाव परंपरेमुळे आहे; त्यामुळे त्यांची बुद्धी संकोचित होऊन त्यांच्यावर जो हा विषम ग्रंथांचा घट्ट परिणाम आहे, तोच गुलामगिरी निर्माण करणारा आहे. व हा दुष्परिणाम त्यानी टाकला तर दावा–हेवा राहाण्याचे मुख्य कारण संपते, असे जोतीराव म्हणाले. स्त्रीशिक्षणादि सुधारणेच्या छंदी लागले, म्हणून जोतीरावाना त्यांच्या बापाने घराबाहेर घालविले. व म. फुले गेले. ग्रंथप्रामाण्य, शब्दप्रामाण्य, व अवतारप्रामाण्य लोकहितवादीनाही नामंजूर होते. म्हातारपणी ते घरी देवदेवतार्चन करू लागले असे त्यांच्या आद्य चरित्रकारानी (कै. कृ. ना. आठल्ये) गौरवाने व मुद्दाम शेवटी सांगितले आहे, तरी लोकहितवादी बहुदेवतावादी नव्हते. त्यांनी त्यांची सर्व पूर्वीच्या हयातीत जाहीरपणे जी मते त्यानीच प्रतिपादिली ती आता सर्व पालटली व ती त्याना नामंजूर आहेत असे

कधीच सांगितले नाही. पूजाप्रकार व पूजापद्धती यासंबंधीचा वैयक्तिक मतभेद दुय्यमच होय. आर्यसमाजात जाऊन लोकहितवादी अग्नीपूजा करू लागले, याबद्दल प्रार्थनासमाजाचे मुखपत्र "सुबोधपत्रिका" ह्याने त्यांच्यावर टीका केली आहे. उपासनापद्धतीमुळेही भक्तिसंप्रदाय व समाज वेगळे होतात. विचारवंतातही भेद पडतात !

लोकहितवादींचा प्रार्थनासमाजाशी जवळ जवळ संस्थापकीय संबंध व त्यांच्यातील परमहंस सभेशी व मताशी ऐक्य, व त्यानी अहमदाबाद व सुरत वगैरे गुजराथमधील प्रार्थनासमाजाशी ठेवलेला शेवटपर्यंतचा प्रत्यक्ष संबंध हे सर्व दृष्टीआड करून प्रार्थनासमाजाने त्याना परके व दूरचे मानिले व अजून मानितो. मग सनातन्यानी त्यांची उपेक्षा केली यात काय नवल ? जो परकेपणा सांप्रदायिकामध्ये निर्माण झाला, तो न्या. मू. रानडे यांच्यात खुद्द नव्हता. 'जे का रंजले गांजले । त्यासी म्हणे जो आपुले ॥' हा तुकारामाचा अभंग घेऊन लोकहितवादींच्या निधनानंतर त्यांच्या कार्यावर सन्माननीय न्या. मू. रानडे यानी जो प्रकाश टाकला तो खास परिचयानंतरचा होता; न्या. मू. रानड्यांनी प्रथम लोकहितवादीना चांगले जाणिले.

लोकहितवादी व फुले या दोघानी ( दयानंदानीही पुराणावर ) हल्ला चढविला. तो डॉक्टर भांडारकराना नामंजूर होता. म्हणजे लोकहितवादीनी "पुराणे म्हणजे शिमगा" असा एकदा उल्लेख केला होता. डॉ. भांडारकर हे मूलभूत अभ्यासक व सारग्राही विद्वान होते. त्यानी लोकहितवादींचे खंडण करणारे व्याख्यान दिले. ते उपलब्ध आहे. म. फुले–लोकहितवादी यांची कडक, झुंजार व तडफदार प्रकृती नेमस्त - मवाळ व प्रागतिक प्रार्थनासमाजिष्टाना मानविणारी नव्हती. मग सनातन्याना ती कशी आवडेल व परवडेल ? म. फुले यानी लोकहितवादींच्या पुढे जाऊन ब्राह्मण उपाध्यायाखेरीज लग्नादि सर्व संस्कार करण्याची नवी चाल सुरू केली. हेदेखील जहाल पाऊल प्रार्थनासमाजाला व खुद्द रानड्याना परवडणारे नव्हते. पण प्रार्थना-समाजाने विरोध केला नाही. देता येईल तेवढा पाठिंबा दिला. रानड्यानी वैचारिक मान्यता दिली.

खुद्द ब्राह्मणेतर सर्वसामान्य समाजाला ब्राह्मण उपाध्याय आजही जरूर वाटतो व त्याच्यावाचून त्यांचे चालतच नाही. यात यजमानाचा मुख्य दोष व निर्बलता सार्वजनिकपणे प्रकट होते. पण हा मुद्दा प्रथमपासून विवेचनातून बाजूस पडला, हेही खरे. ब्राह्मणांचे ( लोकहितवादी – फुले यांच्या लोकजागृतीतून )

उत्तरोत्तर राजकीय, आर्थिक व सामाजिक महत्त्व कमी झाले व फक्त ' विधी " करण्यास परंपरेप्रमाणे ब्राह्मण असला तर आता फारसा म्हणजे मुळीच देखील विरोध राहिला नाही. खरे सत्यशोधक वाढले नाहीत- परंपराच जास्ती समर्थ ठरली ! फुले–लोकहितवादीत दोष नाहीत असे येथे ठरवावयाचे मुळीच नाही. सत्य तेवढे घ्यावे व असत्य शोधून त्याचा त्याग करावा ही जीवनपद्धती लोकहितवादी व फुले या दोघांचीही होती. धर्मग्रंथ मनुष्यकृत आहेत अशी दोघांचीही धारणा होती. समाजाला जे अयोग्य स्वरूप प्राप्त झाले होते, ते पालटावे, व ह्यासाठी विद्यावृद्धीचा उपाय दोघानीही समानपणे पुरस्कारिला. म. फुले ( व लोकहितवादी यांची देखील ) इतराना शूद्र–नीच–कमी व हलके समजण्याची जी चाल होती व पेशवाईत ती वाढली व नंतरही इंग्रजीतदेखील प्रारंभी जारी होती, या संबंधी लोकांची मुख्य तक्रार होती. आज सोवळे ओवळे व इतराना शूद्र समजणे या वहिवाटी मोडल्या म्हणून प्रसंगविशेषी ब्राह्मणपुरोहित लग्नाकार्यात आला व गेला, तर हरकत कोणी घेत नाही. सुपात्र ब्राह्मण निवडणुकीला उभा राहिला तर त्याला मते देऊन निवडून आणावा असे आज काँग्रेसमधील बहुजनसमाजाच्या नव्या नेतृत्वाला ( मनापासून ) वाटत नाही. ब्राह्मणेतर राजकीय चळवळीला यश याप्रमाणे आले पण खुद्द मूळच्या सत्यशोधक एकेश्वरी नैतिक तत्त्वाना यश आले नाही. तरी आताही प्रार्थनासमाजासह सर्व वरील नवयुगसमाजांच्या शाखा–उपशाखा त्यांच्या शक्तीप्रमाणे समाजसेवा करीत आहेत. न जाणो ! भावी महाराष्ट्रात याना अनुकूल असा नवाकाळदेखील येईल ! व त्यावेळी म. फुले–लोकहितवादी यांचे महत्त्व भूमितीश्रेणीने दृग्गोचर होईल. ह्या दोघांचे टीकाकार चिपळूणकर यांची टीका ह्यांच्या काळात मात्र फार लोकप्रिय ठरली ! हे खरे !

## इतिहाससंशोधक लोकहितवादी

लोकहितवादी फक्त धर्म व समाजसुधारकच नव्हते ! गोपाळ हरी ग्रंथकार व इतिहास संशोधक होते. विभूतिपूजेचे पटल दूर करून नाना फडणीस यांचे ऐतिहासिक खरे स्थान लोकहितवादींनी लोकापुढे मांडिले. अर्थात मालाकर चिपळूणकर याना आवडले नाही. पेशव्यांचे रेकॉर्डस्‌ला न्या. मू. रानडे यानी प्रस्तावना लिहिली आहे. रानडयांच्याप्रमाणे लोकहितवादी हे देखील न्यायखात्यात न्यायाधीश म्हणून पुष्कळ वर्षे होते. म्हणून इतिहास व निबंधलेखन या दोन्ही ज्ञानाच्या क्षेत्रात या दोघा न्यायाधीशांची निःपक्षपात

न्यायबुद्धी व समतोल नजरेस पडतो. पुढील इतिहाससंशोधकानी ह्यांचा काटेकोर न्याय सांभाळला असता, व पुढेदेखील सर्वपक्षानी सांभाळला तर महाराष्ट्रइतिहास जास्ती शुद्ध व समतोल स्थितीत लोकापुढे येईल.

इनाम–कमिशनचे किचकट काम पहात असताना लोकहितवादींच्या नजरेतून अनेक सनदा व ऐतिहासिक दस्तऐवज व कागद गेले. हे कार्य जिकी-रीचे होते. चिकाटी वगैरे नोकरीपेशाला लागणारे सर्व गुण व जबाबदार वरिष्ठ प्रशासकाला लागणारी कुवत लोकहितवादीत खास होती. म्हणूनच युरोपीय वरिष्ठ अधिकाऱ्यानी त्यांची योग्यता जाणून वारंवार बढत्या त्याना त्यांच्याकडून मिळाल्या. उच्च पदे मिळाली. राज्यकर्ते व लोकप्रजा या दोघां-चीही त्यानी सेवा केली. पुढे दिवाणपदापर्यंतची उच्च स्थाने स्वकर्तबगारीने चालविली पण हे सर्व खाजगी गुण म्हटले तरी निरपेक्ष व तटस्थ इतिहास-संशोधन व इतिहाससाधनांचा संग्रह करण्याचा व्यापकपणा हा सार्वजनिक आदर्श ठरतो. लोकहितवादीनी नव्या आधुनिक शिक्षणाचा, राजा राममोहन राय यांच्याप्रमाणे महाराष्ट्राला जो संदेश दिला, व स्वतः उच्च पदव्या संपादित केल्या, त्या नव्या काळाला धरून होत्या. ह्याशिवाय संसारात दुसरी चांगली गती उपलब्ध नव्हती. रानडे–चंदावरकर–लालशंकर उमियाशंकर वगैरे न्यायाधीश झाले न त्यानीं नोकरीच्याही कैचीत राहून देशाची लक्षात घेण्याजोगी सेवा केली व नेतृत्वही केले.

## लोकहितवादींचे निदान

लोकहितवादीना समाजनिरीक्षण फार चांगले होते. त्यांचे सामाजिक नाडीज्ञान किती अचूक होते याचे ज्ञान त्यांच्या पुढील विचारावरून आजही समजू शकते :–

"विचार नष्ट झाले. लोक निरंकुश बनले, मन मानेल तसे वागू लागले. यामुळे दया, मैत्री, न्याय इत्यादि सर्व नाहीशी झाली. लोक स्वच्छंदी झाले. ब्राह्मणानी लोकाना सन्मार्ग न दाखविता उपद्रव देण्यास सुरवात केली. यामुळे लोक असंतुष्ट होऊन कित्येक ब्राह्मणांची भिक्षुकी बंद करण्याचा विचार करीत आहेत. भटजी पांच रुपये देऊनही क्रियाकर्म करावयास तयार नाही हे पाहून नडियादमध्ये सुतार लोकानी अंत्यकर्म करावयाचे नाही असा निर्णय घेतला आहे. त्याचप्रमाणे ब्राह्मणाकडून कोणतेही धार्मिक कार्य करून घ्यावयाचे नाही, यासाठी लोकांची संमती मिळविण्याचे

काम पुण्यात जोती गोविंदराव हे करीत आहेत. ही सर्व गडबड होण्याचे कारण ब्राह्मणांचा उन्माद हेच होय. जो जो ज्ञान वाढत जाईल. तो तो लोकाना ही जाणीव झाल्यावाचून राहणार नाही."

— लोकहितवादीकृत 'निगमप्रकाश" (सन १८७४)

लोकहितवादींनी याप्रकारे सत्यशोधक प्रतिक्रियावादी चळवळींच्या उद्भवाचे व विकासाचे कारण सांगितले आहे. ह्या कारणाचा पत्ता समकालीन असूनही निबंधमालाकार याना लागला नाही. गोपाळ हरी यानी जोती गोविंद याना जाणले होते व जोती गोविंद यानी गोपाळ हरी यांची योग्यता पूर्णपणे जाणली होती. दोघेही द्रष्टे होते. म. फुले स्वतःला अनार्य वर्गातील समजत. व "अनार्य" ह्या त्यांच्या संज्ञेचा त्याना अभिप्रेत असलेला अर्थ शूद्रातिशूद्र म्हणजे सर्वसामान्य ब्राह्मणेतर जनता, असा होता. म. फुले यानी लोकहितवादी वाचले होते, पाहिले होते म्हणजे दृढ सहवासातून जाणले होते. लोकहितवादींचा उद्देश व योग्यता जाणणारात म. फुले हे एक समकालातील विवेकवंत नेते होते. फुले यानी शेवटी केलेल्या अखंड कवितेत गोपालराव देशमुख यांचा उल्लेख मिळतो. व तो एकच मोठा उद्बोधक आहे. "आर्याजींची नीती अति अमंगळ ॥ कथीली गोपाल देशमूखे ॥" ( महात्मा फुले समग्र वाङमय पान ४९६ )

म. फुले व लोकहितवादींना केवळ "ब्राह्मणद्वेष्टे" एवढेच विशेषण लावून त्यांच्या विचाराकडे पाठ करण्यात आली; म्हणूनच सामाजिक वाद त्यांच्या पश्चात जास्ती निर्माण झाले. केवळ असल्या सामाजिक-धार्मिक-व राजकीय वादांचे पुढील सर्वच दायित्व या दोघावर लादून मोकळे होण्यात अर्थ नाही. कारण उभय समाजात फार काय सर्वच लोकात विश्वासाने एकात्मता कोणत्या कारणामुळे व कशी नांदू शकेल, याचेही मार्गदर्शन या दोघात सापडते; व त्याकडे मात्र दुर्लक्ष केले गेले. लोकहितवादींच्याकडे पाठ केल्याने दुष्परिणाम घडले. अजूनही ते अभ्यसनीय आहेत. "लोकहितवादी फुले" यांच्या वरील "रजाचा गज" करणारे लोकापवाद व लोकनिंदा यांचा प्रभाव मावळला आहे; कारण यांचे कार्याधिक्य, गुणाधिक्य व परिणामाधिक्य यांचे पारडे काळाने जड ठरविले.

## समन्वयक धोरणाचे ध्येय

लोकहितवादी हितचिंतक होते पण फुल्यांच्या समाजाचे सभासद नव्हते. ह्या लेखातील इतर काही विधाने पुष्कळाना बादरायणीय वाटणारच नाहीत

असे नाही. उदाहरणार्थ परमहंस सभा व लोकहितवादी यांचा जोडलेला संबंध नवा वाटेल. लोकहितवादी पुण्याच्या परमहंस सभेत होते असे अद्याप म्हटले गेले नाही; व स्वतः लोकहितवादीनी ह्या विषयासंबंधी उल्लेख केलेला नाही. तरी त्यांच्यात जातिभेद व मूर्तीपूजा यांच्या वरील खंडण आढळते. तरी प्रार्थनासमाजाचा रानडे-भांडारकर यांच्या इतका त्यानी एकमेव पुरस्कार केला नाही. ब्राह्मोसमाजी मोठमोठ्या पुढाऱ्यांची पूज्यपणे चरित्रे लिहिली नाहीत. उलट दयानंद यांचे मात्र सन १८८३ च्या आगे मागे त्यानी चरित्र लिहिले. यावरून ब्राह्मो–प्रार्थनासमाजापेक्षा त्यांचा कल आर्यसमाजाकडे बहुत होता. हे खरेच. म्हणून त्याना रानडे–भांडारकर – चंदावरकर व शिंदे यांच्या प्रमाणे प्रार्थनासमाजाचे पुढारी व प्रवर्तक गणिले जात नाही. आर्यसमाजाचे व दयानंदांचे पुरस्कर्ते म्हणून लोकहितवादी होऊन गेले तरी महाराष्ट्रात आर्य-समाजाला प्रार्थना व सत्यशोधक समाजाइतकाही पाठिंबा मिळाला नाही व त्याची चळवळ गाजली नाही म्हणून लोकहितवादींचे नाव मागे पडते.

दादोबा पांडुरंग परमहंस सभेचे व गुजराथमधील मानवधर्म सभेचेही संस्थापक ठरतात; व "धर्मविवेचन" ( प्रसिद्धी काल १८६८, पण ग्रंथलेखन १८४३ ) ही त्यांची धर्मपुस्तिका परमहंस सभेचा व मानवधर्म सभेचाही जाहीरनामा ठरतो. "गुलामगिरी" हा ग्रंथ (सन. १८७३) सत्यशोधक समाजाचा जोतिरावकृत पहिला जाहीरनामा ठरतो. ब्राह्मोसमाजाची सहिष्णु-वृत्ति न आवडल्यामुळे वेदप्रामाण्यावर आर्यसमाजाची संस्थापना दयानंदानी केली. दादोबा – दयानंद – 'लोकहितवादी फुले' यानी ब्राह्मोसमाजाशी अस-लेला समान तात्त्विक धागा स्वतः होऊन दर्शविला नसला तरी राममोहन राय यानी उद्‌घाटण केलेल्या आधुनिक धर्म व सामाजिक प्रबोधनातील ह्या सर्व चळवळी बहिणी–बहिणी (Sister Movements) ठरतात. दयानंदानी वेदांचा अर्थ एकेश्वरी पद्धतीचा लावला. आणि म. फुले तर कट्टे एकेश्वरी होते. नामकरण, शाळेत जाण्याचा संस्कार, लग्न व अंत्यविधी यांची स्वतःच प्राकृत रचना त्यानीच केली व ती घरी–दारी पाळण्याचा अट्टाहास केला. म्हणजे या साऱ्यांची धर्ती मूळच्या व कालक्रमानुसार अगोदर स्थापन झालेल्या एकेश्वरी ब्रह्मसमाजाप्रमाणे ठरते. तत्त्वतः व तत्त्वमूलक विचार केल्यास बादरायणीय संबंधाचा हा प्रयत्न नव्हे. इतिहास वेगळे झाले; व वरील सर्व व्यक्तींच्या चरित्रातही खूप–खूप तफावती पडल्या. मागे ऐतिहासिक काळातील संस्थापक व्यक्ती – व्यक्तीत फरक पडला, म्हणून काळ पालटल्या-वर तो आता तसाच सतत मानावा, हेही भावनिक ऐक्यास सोडून होते.

म्हणूनही लोकहितवादी व फुले यांचे समन्वयक दर्शन जरूरीचे आहे. व महाराष्ट्राच्या बहुजन समाजाच्या चळवळीतील लोकहितवादींचे पूर्वस्थान जाणले पाहिजे. सुधारकाग्रणीत सुधारणाक्षेत्रात व धर्माच्या बाबतीतही एक-वाक्यता व एकसंघता होऊ शकली नाही. त्यांच्यात भिन्न वर्ग पडले. म्हणूनही सुधारणावादाची हानी झाली.

## पालटलेला काळ

लोकहितवादींनी थिऑसॉफिकल चळवळीतही भाग घेतलेला आढळतो. बहुतेक समाजसुधारकांच्या सुधारणेचा पाया धर्मशुद्धी हा होता. अवास्तविक गर्व नाहीसा करून समाजात त्याच्या उत्थानासाठी आत्मपरीक्षण व आत्मदोष यांची जाणीव करून देणे हे धर्मसुधारकाचे ध्येय होते. "संपूर्ण देशाचे लोक आम्हापुढे तुच्छ व आम्ही श्रेष्ठ ! तेव्हा हा भाव मोडण्यास व त्यास ताळ्यावर आणण्यास परदेशातील सुधारलेले लोक व त्यांची गाठ घालून देण्यापेक्षा उत्तम उपाय दुसरा काही आहे, असे वाटत नाही. यास्तव ईश्वराने ह्या देशात इंग्रजांची प्रेरणा केली आहे." असे लोकहितवादींनी म्हटले आहे. 'डिव्हाईन डिस्पेन्शन"चा हा सिद्धांत नंतर रानडे वगैरे सुधारकात आढळतो. फुल्यांच्यामध्ये हा विचारदेखील सांपडतो. (महात्मा फुले : समग्र वाङमय पान ३६९ व / ३७० ). ह्याच विचारामुळे मुख्यतः सर्वच सुधारक नेमस्तमार्गी झाले. तर लोकहितवादी व फुले या दोघानीही इंग्रज आपले लोक सुधारल्यावर मुळीच राहाणार नाहीत असे द्रष्टेपण व्यक्त केले आहे. "इंग्रज आपल्या जन्माला पुरणार नाहीत. ते आज आहेत व उद्या नाहीत" अशा प्रकारचे विचार महात्मा फुले समग्र ग्रंथ पानांक १३६ वर कोणासही आढळतील, अशी वैचारिक साम्य स्थळे अनेक दाखविता येतील.

आज इंग्रज तर गेले ! लोकहितवादी आणि फुले यानी ब्राह्मणासंबंधी जो विस्तृत विचारप्रपंच केला आहे. तीदेखील परिस्थिती राहिली नाही. म्हणून फुकट "लोकहितवादी व फुले" यांच्यावर त्यांचे दर्शन घडवन देण्यासाठी, कालबाह्य झालेल्या त्या उत्तर पेशवाईच्या नंतरच्या परिस्थितीवर लिहीणे–बोलणेचीच अर्थात तितकीशी गरज राहिली नाही. 'धारदार' ह्या दोघांच्या भाषापद्धतीचे अनुकरण करण्यात फायदा नाही. त्यानी दिलेली नैतिक सुधारणेच्या संबंधीची निवडक तत्त्वे व विचारसरणी आज जास्ती चिंतनात घेतली पाहिजेत. काळ फार पालटत आला आहे, व पालटत आहे. पुढेही मागचा गेलेला काळ तसाच पुनः येणार नाही. म्हणून पुढे पाहिले पाहिजे.

अनुक्रमणिका

लोकहितवादी–रानडे यांच्यावेळी नोकऱ्या ह्या परकीय सरकारच्या होत्या. त्यानी त्या धरल्या यात त्यांचा वैयक्तिक नाइलाज झाला, हे खरे. तरी या संबंधीची जाणीव दोघातही होती. दीर्घोद्योग करून यानी स्वप्रपंच केले; व उरलेला काळ जास्तीत जास्त लोकोद्धारार्थ विविध प्रयत्न करण्यात व्यतीत केला. रानडे व लोकहितवादी' यांच्यात जीवनक्रमाच्या दृष्टीने 'म. फुले व लोकहितवादी" यापेक्षा अर्थात जास्ती साम्य आढळते. "सर्व देशबांधवावर प्रेम करणे, म्हणजे देशभक्ती." ही देशभक्तीची व्याख्या स्वराज्याचे सुराज्य करण्यास उपयोगी ठरते. आजच्या लहान मोठ्या व मोठ्यातल्या मोठ्या कर्मचाऱ्यानी ह्यांची तत्परता वगैरे वरील अनेक नोकरीस लागणारे गुण अंगीकारून शासन सुधारण्याचा मार्ग पत्करिला, तरी यापुढे देशाचे मोठ्यातलें मोठे कल्याण होऊ शकेल. आजकालच्या भ्रष्टाचारी शासनाला व न्याय वगैरे खात्यातील धुरीणाना नेमस्तांची वरील चरित्रे, आदर्श आहेत. आजच्या विस्तृत नोकरशाहीच्या नोकऱ्या आता स्वराज्याचे सुराज्य होण्यास कारणीभूत झाल्या नाहीत, तर हे नोकरशाहीचे मोठे अपयश व शोकांतिका ठरेल. फुले–लोकहितवादी यांच्या काळात स्वतः राष्ट्रीय सभा राजनिष्ठ व पूर्ण मवाळ होती.

लोकहितवादीनी नोकरी ठिकठिकाणी करीत असतानाच वाचनालयाच्या चळवळीला, ग्रंथनिर्मिती व ग्रंथसंग्रह या प्रवृत्तीना महाराष्ट्रात जन्म दिला. न्या. मू. रानडयांच्या बहुतेक सर्वांगीण कार्यात लोकहितवादीनी यथाशक्ती व यथावकाश भाग घेतलेला आढळतो. या उभयतात मतभेदाचे प्रसंग आलेच नाहीत, असे म्हणावे लागते. शतपत्रातील विचाराना समांतर असे कित्येक विचार न्या. मू. रानडे यांच्या धीरगंभीर व शांत भाषेत देखील आढळतात.

### उपसंहार

सत्यशोधक समाजाची सन १८७३ ही जन्मशताब्दीची वेळ आहे. अशा वेळेस लोकहितवादी–फुले यांचा संयुक्त विवेक पुढे ठेवणे क्रमप्राप्त वाटते. लोकहितवादी व रानडे यांनी जन्मभर मागासलेल्या लोकात विद्याप्रसार व्हावा म्हणून चिंता सक्रिय वाहिली. लोकहितवादी देशमूख 'डेक्कन मराठा एज्युकेशन असोशिएशन' पुणे ह्या विद्येत मागासलेल्या विद्यार्थ्यांना विद्यावेतने देणाऱ्या पहिल्या संस्थेचे सभासद होते. न्या. मू. रानडे हे तर ट्रस्टी व पेट्रन होते. सन १८८५ ते १९०० पर्यंत न्या. मू. रानडे यांनी रक्कम रुपये १०८० देणगी म्हणून दिले, व मृत्युपत्रान्वये ३५/– रुपयांचे वर्षासन चालू करून दिले. (हीरक महोत्सव– अहवालावरून)

गोखले–परांजपे वगैरे नेमस्त पुढाऱ्यांनी देखील वरील विद्याप्रसाराच्या क्षेत्रात करिता येईल तितकी त्या काळात न्या. मू. रानडे–लोकहितवादींच्या विचारसंदर्भात कामगिरी बजाविली. राजर्षि शाहू महाराज यांनी "रानडे–गोखले" यांचा गुरु म्हणून कृतज्ञतेने उल्लेख केला आहे. परंतु महाराष्ट्राला सन १९१७ नंतर पुढे म. गांधींची स्वातंत्र्यसंग्रामाची चळवळ तीव्र होईपर्यंत, निदान १९३३ पर्यंत तरी, ब्राह्मण–अब्राह्मण राजकीय वादाची म्हणजे जातीय विकृतीची पीडा– व्याधी जडली. ह्यामुळेही लोकहितवादी–रानडे यांच्या कामगिरीचे वास्तविक मूल्यमापन मध्यंतरी मागे पडले. परकीय सत्ता व 'फोडा व झोडा' ( Devide and Rule ) ही नीति संपली. नेमस्त व जहाल हे द्वैत संपूर्ण संपले. स्वराज्य आले आहे त्याचे सुराज्य व्हावयाचे आहे. नेमस्तांची कामगिरी व त्यांच्या सामाजिक सुधारणा उपेक्षित राहण्याचे आता कारण नाही. रानड्यांच्या इतका लोकहितवादींचा प्रत्यक्ष राजकारणाशी संबंध आला नाही; तरी लोकहितवादी हे विविध सर्वांगीण अनेक संस्था उभ्या करिताना रानड्यांच्या पाठीमागे होतेच. विद्येत मागसलेल्या लोकांच्या चळवळींची उपेक्षा न करिता, त्यात प्रसंग साधून भाग घेण्याची प्रवृत्ती लोकहितवादी–रानड्यात होती. सन १८८७ नंतर अर्धांगवायूने म. फुले सन १८९० साली मरेपर्यंत अंथरुणावर खिळून होते. अशा त्यांच्या पडत्या काळात रानडे–लोकहितवादी यांनी विद्याप्रसाराचा विधायक रथ पुढे ओढला. हे प्रत्यक्ष पाहिले व अनुभविले असल्यामुळे म. फुले यांच्या वेळचे विद्येत मागासलेल्या वर्गातील पहिले पुढारी लोकहितवादी–रानडे यांच्या संबंधी त्यांचा उदारभाव व कैवार, पाहून कळकळ बाळगीत. त्यांच्याबरोबर कार्य करीत. पुढे हे अद्वैत विसरले गेले; व केवळ वरिष्ठ मानलेल्या जातीत जन्म झाला, हाच दोष गणला जाऊ लागला, व जातो. हे दुर्दैव होय. पण ह्यापुढे सारासार विचार झाला पाहिजे. म. फुले यांना व त्यांच्या विचारप्रवाहाला जातिदुराभिमान व अहंकार बाजूस ठेवून मदत करणे हा, विचार–आचार प्रवाह लोकहितवादी–रानडे यांनीच संस्थापिला. माणसाची योग्यता त्यांच्या जन्मप्राप्त जातीवर अवलंबून नसून ती माणसाच्या गुणावर व कर्तबगारीवर अवलंबून आहे, हा सत्य-शोधक समाजाचा मुख्य जो तात्विक विवेक आहे. तो निदान यापुढे तरी वाढीस लागला पाहिजे. ब्राह्मण-अब्राह्मण-हरिजन बौद्ध वगैरे सर्वांनी गुणाना प्राधान्य दिले पाहिजे. मराठीत माझे मित्र श्री. धनंजय कीर यांचे म. फुले यांचे चरित्र हे आता नवे अद्यावत व नवे प्रमाणभूत चरित्र म्हणून गणले जाते. परंतु याही विवेचक व साधार चरित्रात लोकहितवादी-रानडे

अनुक्रमणिका

यांच्या पडत्या बाजूंचे मांडवल करून म. फुले यांची प्रतिमा-मूर्ति उजळपणे दाखविण्याचा ठिकठिकाणी प्रयत्न झाला आहे; (पृष्ठे ७९, १११, १५६–५७) ह्यातील मुद्दे व घटना खऱ्याच आहेत, पण अशा प्रकारचा प्रयत्न खुद्द म. फुले व त्यांचे खुद्द सहकारी-मित्र यांना तथा काळात कितपत आवडणारा होता हा प्रश्नच वाटतो. आज ज्याला राजकारण म्हणतात व पुढे ज्याला ब्राह्मणेतर पक्ष म्हणून म्हटले गेले तो पुढील राजकीय भाग लोकहितवादी-रानड्यांच्या काळात नव्हता. राष्ट्रोन्नतीच्या दृष्टीतून राष्ट्रीय सभेच्या स्थापनेनंतर पाहिले जाऊ लागले. अंत्यजांविषयी देखील प्रत्यक्ष कार्य चालू करावे, व्हावे असा जिव्हाळा लोकहितवादीत सापडतो. ही ह्यांची इच्छा म. फुले-व महर्षि शिंदे यानी पुरी केली. विवेकाच्या डोळ्याना ब्राह्मण-अब्राह्मण असा जन्मजातीय चष्मा ( काळ्या रंगाचा ) विचार-चक्षूना न लाविता महर्षि शिंदे यानी वैचारिक व आचारात्मक सर्व कृती केली. सत्यशोधकानी विचार–आचार करताना महर्षि शिंद्यांचा आदर्श पुढे ठेवावा; व ह्या स्वच्छ आरशात त्यानी त्यांचे चेहरे पाहून स्वच्छता साधावी. म. फुल्यांच्या प्रमाणेच वरिष्ठ जातीत जन्म पावलेल्या अनेक पहिल्या परमहंस व प्रार्थनासमाजातील कर्त्या पुढाऱ्यांचे कर्मवीर शिंद्याना वेळेवर महत्त्वाचे साह्य झालेच होते. व या दोघानी साह्य व सहकार्य घेतले. सत्यशोधक जन्म-शताब्दी वर्षातच महर्षि शिंदे शताब्दी येते. अशा योगायोगाच्या वेळी वरील मुद्दे स्पष्ट करण्याची जरूरी वाटते. व लोकमान्य टिळक व चिपळूणकर संप्रदाय यानी लोकहितवादी-रानडे यांची उदार सामाजिक–धार्मिक दृष्टी पत्करिली असती तर महाराष्ट्राला शापभूत पुढे ठरलेल्या दुष्ट व अनिष्ट वादाला दुधारी धार आली नसती! झाले ते गेले! कोळसा उगाळण्याचा हेतू नाही. पण स्वराज्याचे सुराज्य करण्यास कारणीभूत होईल असा मोठा भाग नेमस्तांच्या विचारात कोणासही आढळेल. म. गांधीना आढळला म्हणून ना. गोखले याना त्यानी मानिले. लोकहितवादी हे राजकीय नेमस्तांचे पहिले अध्वर्यू ठरतात. "सुधारक हे बोलघेवडे असतात" ही व्याख्या स्वतः म. फुल्यानी तरी खोटी ठरविली.

म. फुले व लोकहितवादी यांच्यात महदंतर पुष्कळ आहे. पण ते बाह्य महदंतर आहे. उदाहरणार्थ म. फुले यांना पुनः शालजोडी अर्पण करण्याची गरज इंग्रज अधिकाऱ्याना मुळीच वाटली नाही. महात्मा फुले फार पक्के होते. फुले यांच्या विचारा-आचारात गूढ कोडी आहेत; त्यांचा खोल आशय

अनुक्रमणिका

वरवर पहाणाराना कळणे अवघड आहे. सत्यशोधक समाज हा शूद्रातिशूद्रांच्या उद्धारार्थ आणि त्यांची गुलामगिरीतून सुटका करण्यासाठी सन १८७३ साली निघाला. शतपत्रामागे ब्राह्मणांची सुधारणा करणे हा लोकहितवादींचा मुख्य हेतू होता. इंग्रजी शिक्षणाची तरफदारी लोकहितवादीनी केली व ब्राह्मणानी सर्व प्रथम इंग्रजी शिक्षण घेण्यात अग्रेसरत्व पत्करिले. व त्यानी नव्या इंग्रजी शिक्षणाच्या शाळा महाराष्ट्रात उघडल्या. पण ब्राह्मणांचा वेगळा स्वाभिमान निर्माण करणे किंवा त्यांचा स्वतंत्र पक्ष करणे हा लोकहितवादींचा उद्देश नव्हता. येथे दोघात फरक आहे.

सर सय्यद अहमदखान व म. फुले यांच्या विचार-आचार धारेत पुष्कळ साम्य आहे. दोघेही आपआपल्या समाजाच्या शिक्षणाचे महान् पहिले प्रवर्तक झाले. पण ब्राह्मण-अब्राह्मण यांची संस्कृति-धर्म व पुण्यभूमी एकच असल्या-मुळे परकीय इंग्रजांची भेदक नीति महाराष्ट्रात पराभूत पावली. म. फुले यांच्या विचारा-आचारातून स्वाभिमान निर्माण झाला, हे खरे. पण तो राष्ट्रीय-त्वाला महाराष्ट्रात तरी फारसा मारक ठरला नाही, पुढे सर्व सत्यशोधकानी म. गांधींच्या लढ्यात भाग घेतला. सर्वच म. फुल्यांना कोणीच सतत सर्वप्रमाण मानीत नाहीत. वेळोवेळी जेवढा भाग पाहिजे वाटतो, तेवढा घेतला गेला व घेतला जातो, एवढेच. जातिभेद टाकणे (जातिनिर्मूलन करणे), मूर्तिपूजा सोडणे, भोळा भाव टाकणे, व अस्पृश्यता निवारण आणि मानवधर्म या बाबतीत म. फुल्यांच्या, असंख्य अनुयायानी त्याना प्रमाण मानले नाही. यामुळे म.फुले यांचे चहाते व खुद्द म. फुले यात महदंतर आहे. व याची सर्व जबाबदारी अनुयायी व चहात्यावर येऊन पडली आहे. शहरापेक्षा खेड्यातील शेतकरी जनता, सनातनी व परंपरावादी व रूढी आणि वाडवडिलार्जित चालीरिती याना बांधली गेली आहे. व ह्या स्वतःवर स्वतःच लादून घेतलेल्या गुलामगिरीतून मराठी शेतकऱ्यानी स्वतःच मुक्तता करून घेतली पाहिजे. म. फुले-लोकहितवादी यांच्या काळाप्रमाणेच आता त्याना दुसऱ्या कोणा शहरी वरिष्ठांना किंवा तत्सम साव-सावकाराना-व जमीनदारांना जबाबदार धरिता येणार नाही. कारण सत्ता त्यांच्याकडे आहे. कर्ज देणारी व परत घेणारी सहकारी चळवळीचे मालक हेच आहेत.

म. ज्योतिबा आता समुद्रासारखे आहेत. त्यांच्या विचारांच्या लाटा जनतेच्या अगदी खालच्या थरापर्यंत पोहोचल्या आहेत. लोकहितवादी असे खेड्यापाड्यापर्यंत सर्वांना माहिती नाहीत. समुद्रात बुडी दिल्यास माशांचे

सांगाडे व इतर पुष्कळ निरुपयोगी व अस्वच्छ पदार्थ हाती लागतात. पण मोती इत्यादि रत्ने देखील मिळतात. या न्यायाने म. फुले यांच्या वैचारिक बगीच्यातील सुवासिक फुले (शाश्वत आशय) गोळा करावी लागतात. लोकहितवादी व फुले यांच्या प्रत्यक्ष कामगिरीविषयी आता वादच राहिला नाही. म. फुले यानी शेवटी असूडाच्या निबंधात (१८८३–८५) शेती व शेतकरी या विषयावर पुष्कळ विधायकदृष्टीचा रचनात्मक विचारप्रपंच केला आहे. लोकहितवादीनी व्यापार–उद्यम आणि आर्थिक दृष्टीतूनही विचार-चालन केले आहे. म. फुल्यांचे गद्यात लांब व मोठी वाक्ये आहेत. सहानु-भूतीने व थांबून काळजीपूर्वक त्यातील उद्देश जाणावा लागतो. तरच समज वाढतो. लोकहितवादींचे गद्य सरळ चटकन अर्थबोध करिते. ज्योतिबात विद्वानाना व्याकरणादि बाबतीत अनेक उणीवा दिसल्या तरी त्यानी दादोबा पांडुरंग व लोकहितवादी यांच्या उद्देशासाठी जिवाचे रान केले. राममोहन पासून सुरू झालेल्या आधुनिक समाजप्रबोधनात सर्वच भारतात मोठमोठे समाज–धर्म सुधारक होऊन गेले. त्यांचा सुटा व वैयक्तिक अभ्यास होण्यापेक्षा तौलनिक व समन्वयक असा व्यापक अभ्यास झाल्यास समाजप्रबोधनाचा अर्थ चांगला कळू शकेल व भावी प्रबोधनाची पुढील वाटही दिसेल. परमहंस सभा ही सर्व सुधारकांची गंगोत्री व आई ठरते. तत्वतः ती अमर आहे.

लोकहितवादींचे पहिले महत्त्वाचे विचार "प्रभाकर" (मुंबई) पत्रात प्रसिद्ध झाले. या प्रभाकराचे संपादक भाऊ महाजन (सन १८१५ ते १८९०) हे परमहंस सभेचे कट्टे सभासद होते. अर्थात लोकहितवादींचे भाऊ महाजन स्नेही होते.

## लोकहितवादी फुले व फुले लोकहितवादी

जोतीरावांनी शतपत्रे वाचली होती, त्यांचे वाचन मोठे होते. जोतीरावांचे विचार लोकहितवादीत आढळतात एवढेच नव्हे तर ज्या हेतूने–उद्देशाने व ध्येयाने सत्यशोधक बंड उफाळले, त्याचे जिवंत कारण लोकहितवादीनी त्या अगोदरच सांगून टाकले होते :– "मी अेकदा खेड्यात अेका कुळंब्याचे तोंडाने अैकिले की, साहेबांचे राज्य चांगले, साहेब न्याय अिनसाफ चांगला करितो, पण ब्राह्मण लोक त्यास शिकवून आमची घरे बुडवितात आणि बहुतकरून सर्व रयतेची समजूत अशीच आहे, आणि ती खरी आहे." [शतपत्रे पृष्ठ ४४] लोकहितवादीनी जे पाहिले–ऐकिले तेच म. फुल्यांनी अनुभविले; व वस्तुस्थिती-तून मार्ग काढिला. नाहीतर पूर्वी फक्त विचारचालन होते! न्या. मू. रानडे

व त्यांच्या प्रार्थनासमाजाला “ मध्यस्थ नको ” हे तत्त्व मान्य होते व आहे. ‘मनुष्यमात्राची एक ज्ञाति’ हा परमहंस सभेचा ६ वा निर्णय होता व दादोबानी धर्मविवेचनात वर्ण व जन्मप्राप्त जाती यांचे खंडण करण्यात विजय मिळविला आहे. कै. तुकाराम तात्या पडवळ यांचे ‘जातिभेद विवेकसार’ ( १८६१–६५ ) व धर्मविवेचन ह्यातून परमहंस सभेची कैफियत समजते. विचारात दादोबा आणि जोतिबा किती एकाग्र व एकमय आहेत, हेही अभ्यासण्यासारखे आहे. विस्तारभयास्तव या लेखात जास्ती उतारे घेता आले नाहीत. धार्मिक मते एक असूनही परमहंस सभा– प्रार्थना समाज यांना डावलून जोतीबांनी स्वतंत्र बंड का केले याचे उत्तर वरील लोकहितवादींच्या शतपत्रातील प्रातिनिधिक विवेकात आढळते. बंडाला राजकीय, आर्थिक, शैक्षणिक इत्यादी सर्वांगीण कारणे होती. लोकहितवादी व फुले यांची मैत्री ( एकवाक्यता ) खूप बाबतीत दाखविता येते. लोकहितवादींची म. फुल्यांच्या सत्यशोधक समाजाची प्रस्तावनाच शतपत्रांच्या द्वारे लिहिली व लोकहितवादींचे लेखन अगोदरचे म्हणून लोकहितवादी ब्राह्मणेतर–सत्यशोधक चळवळींचे, दादोबा नंतरचे, वैचा-रिक संस्थापक ठरतात. दादोबांच्या विचारात व कृती करण्याच्या उद्देशात लोकहितवादी यांनी वैचारिक भर घातली; व परमहंस गुप्त सभेला जी कृती अभिप्रेत होती, ती “ मी कोणाचेही हातचे अन्नग्रहण करीन ” असा जाहीर-नामा काढून महात्मा फुले यांनी प्रकटपणे कृतीचा व अनुष्ठानाचा पर्वत उभा केला. पूर्व व समकालीन सुधारकांच्या विचाराशी संपूर्ण साम्य असूनही सामाजिक–राजकीय विषमतेमुळे जोतीराव व त्यांचा पक्ष वेगळा होत गेला. लोकहितवादी व फुले यांनी सरकारावर कडक टीका केल्या आहेत. पे-प्रमोशन -पेन्शन या मार्गातूनच जाणे, लोकहितवादींच्या जीवनक्रमाचे डॉ. भांडारकर-चंदावरकर यांच्याप्रमाणेच साधन व मार्ग झाल्याने लढावू सार्वजनिक उघडा कार्यक्रम त्यांना स्वीकारता आला नाही. पण त्यांनी साह्य व सहकार्य केले, व जोतीरावांच्या वृक्षासाठी त्याच्या रोपणार्थ जमीन भुसभुशीत करून ठेविली होती. नोकरी करण्यात त्यांचे पुष्कळ सामर्थ्य खर्ची पडले, हे मात्र खरे.

रतलाम संस्थानातील दिवाणगिरी देखील, मोठमोठे हुद्दे यशस्वीपणे पार पाडल्यावर लोकहितवादीनी निवृत्त झाल्यावरही एक वर्षापुरती पत्करली व ही पुनः वरिष्ठ नोकरी केली. लोकहितवादींची आर्थिक बाजू भक्कम होती. ह्या मानाने फुले सामान्य होते. म. फुल्यांचे सर्व खाजगी कौटुंबिक जीवन व आयुष्य समर्पितपणे सार्वजनिक कार्यात विलीन झाले होते.

विवेकानंदानीही लोकहितवादी व फुले यांच्यापेक्षा कठोर असा पुरोहितवर्गावर कडाडून हल्ला केलेला आढळतो. लोकहितवादीना जितका म. फुले व त्यांच्या विचारप्रवाहाचा अर्थ मागेच उमजला तितका दुर्दैवाने आगरकराना उमजला नाही; व लोकहितवादींच्यापेक्षा त्यांचा जनतासंबंध थिटा वाटतो. नोकरीच्या निमित्ताने का होईना लोकहितवादीना प्रवास व लोकनिरीक्षण प्रत्यक्ष घडून जनतेचे दर्शन झाले. "दीनबंधू" व म. फुले हे राष्ट्रीय सभा ही वरिष्ठांची (म्हणजे ब्राह्मणांची) असे म्हणत होते म्हणजे ती आर्थिकदृष्ट्या कनिष्ठ वर्गाची व त्यांच्या निकडीच्या प्रश्नांची प्रतिनिधित्व करीत नव्हती असे म्हणावयाचे होते. पण दीनबंधू-फुले यांची प्राकृत परिभाषा आगरकराना कळाली नाही; व त्यानी राष्ट्रीयसभा ब्राह्मणांची म्हणणारे बालिश आहेत असे म्हटले आहे. (निबंधसंग्रह ७९) फार काय सांगावे ? आगरकर यानी कोणे एके ठिकाणी म. फुले याना "रेव्हरंड" म्हणून संबोधिले आहे ! माझे मित्र आगरकरांचे चहाते व अभ्यासक समाजभूषण बाबूराव गोखले यानी हे एकदोनदा मला सांगितले, मग लोकमान्य टिळक चिपळूणकराना कोणत्या तोण्डाने नावे ठेवावीत ? येथे सांगण्याचे ध्येय असे आहे की– लोकहितवादी यानी असा विपर्यास केला नाही. म्हणूनच "लोकहितवादी-फुले" असा एकसमयावच्छेदे करून उच्चार व समास हरहमेश होत असतो, तोच ह्या प्रबंधाने जास्ती सुस्पष्ट करण्याचा यत्न केला आहे. एवढेच. राष्ट्रीय सभा स्त्रिया शूद्रातिशूद्रांची नाही असे दीनबंधू–फुले आक्रोश करीत होते. त्याचा अन्वय अर्थ व भावार्थही "केसरी व सुधारक" या दोन्ही पत्राना कळाला नाही. पण म. गांधी यांच्या सामाजिक व राजकीय सुधारणांच्या समन्वयक धोरणामुळे महाराष्ट्रीय जोतीबांचा मराठी बहुजनसमाज कॉंग्रेसमध्ये घुसला व आता मालकही झाला असे म्हटले पाहिजे. त्याने म. गांधीमध्ये अब्राह्मण राष्ट्रीय नेतृत्व पाहिले !

प्रार्थनासमाजाला व त्याच्या नेमस्तपक्षाला समान तत्वे व राजकीय मवाळ धोरण असूनही प्रसंगप्राप्त, कालप्राप्त व अटळ राजकारण करण्याचे सामर्थ्य व इच्छादेखील नव्हती. म्हणून नेमस्तपक्ष असूनही महाराष्ट्रात त्यातूनच वेगळा मवाळ ब्राह्मणेतर राजकीय पक्ष निघाला. विद्येत व हरएक क्षेत्रात बहुजनांचे मागासलेपण होते म्हणून पुढारलेल्या लोकाना "वेगळे" समजून येथे व्यवहारप्राप्त ब्राह्मणेतरांच्या स्वतंत्र राजकीय हालचाली व जातीजातींच्या विद्याप्रसारक सभा, परिषदा, विद्यावेतन देणारे फंडस्–ट्रस्टस् वेगळे निघाले. डेक्कन एज्युकेशन सोसायटी असूनही कार्यभाग झाला नाही. रयत शिक्षणसंस्था निघाली व वटवृक्षाप्रमाणे वाढली. फार काय "दीनबंधू सार्वजनिक सभा"

देखील म. फुल्यांच्या पश्चात शेतकरी व मजूरांचे प्रश्न मांडीत होती. कॉमरेड डांगे यानी देखील या सर्व मजूर शेतकरी चळवळीचा सार्थ अर्थ दुर्लक्षित ठेविला ! म. फुले व त्यांच्या विचारप्रवाहात कित्येक दोष होते, विकृति होती, योग्य आधुनिक परिभाषा त्याना त्यांच्या काळानुसार घेता आली नाही. तरी ही सर्व परिभाषा लोकहितवादीनी जाणली होती. म्हणून "लोकहितवादी-फुले" ही बिरुदावली सिद्ध होते, व कोणासच ती नादरणीय वाटू नये.

### धर्मनिर्णयाचे धोरण

धर्म हा भारतीय संस्कृतीचा प्राण ठरतो. अध्यात्माला विज्ञानाची जोड द्यावी असे लोकहितवादींचे धोरण ठरते. धर्माधर्माविषयी येथे इंग्रज आल्या-वरही स्वतंत्र विचार झाला; व यातूनच नव्या धर्मनिर्णयाच्या धोरणाचा उदय झाला.

शतपत्रे म्हणजे लोकहितवादी व लोकहितवादी म्हणजे शतपत्रे, व ह्या शतपत्रातील अगर तत्सम अनेक विधाने म. फुले यांच्यानंतर वीस पंचवीस वर्षांनी जी महाराष्ट्रात वादग्रस्त चळवळ झाली त्यामध्येही लोकहितवादीनी केलेल्या अनेक विधानासारखी विधाने करण्यात आली, व लोकहितवादींच्या विचारांचे पडसाद व आधार देखील घेतले गेले व जातात. उदाहरणार्थ :– "ब्राह्मणानी देश बुडविला" हे लोकहितवादींचे विधान गाजले. ( आठल्ये कृ. ना. लोकहितवादी पान १५१ ) परंतु लोकहितवादींचा व्यासंग, विपुल वाचन व महत्त्वाचे इतर साहित्य आणि त्यांच्या अंगचे थोर गुण यांची उपा-सना केली गेली नाही, व जात नाही. यापुढे असे होऊ नये व समग्र लोकहितवादी साहित्याचा अभ्यास वाढावा, म्हणजे लोकहितवादी उपेक्षित न राहाता, अपेक्षित राहातील.

परमहंस सभा व दादोबा पांडुरंग कृत "धर्मविवेचन" फार महत्त्वाचे असूनही तेही उपेक्षित राहिले. परमहंस सभेला नानाविध थरातील सभासद मिळाले होते व महाराष्ट्रात बेळगावपर्यंत शाखा- उपशाखा होत्या. कोणतीही क्रांतिकारक घटना व उपक्रम गुप्तपणे सुरू होतो. यात अव्यवहार्य काही नव्हते. पुण्यातील पहिल्या मुलींच्या शाळा देखील गुप्तप्रकारे चालू केल्या गेल्या. राष्ट्रीय सभेची सुरुवातदेखील सन १८७१ पासून अप्रगटपणे होत चालल्याचे आढळते. कोणत्याही बाबतीत अगोदर विवेक–विचार असतो. परमहंससभा जरी नाहीशी झाली, तरी "जातीनिर्मूलन" संस्थेसारखे उपक्रम

महाराष्ट्राला व इतरही भारताला जरूर वाटतात; व वाटतील. परमहंस सभेतून प्रार्थनासमाज परमार्थसाधनासाठी निघाला पण "जातिभेद मोडणे" हा परमहंससभेचा उद्देश धर्म व भक्ती साधनाना प्राधान्य देऊनही दृष्टीआड झाला ! लोकहितवादी-फुले यानी मात्र परमहंस विचारा–आचारात भर घातली. दादोबा व लोकहितवादी पहिले म्हणून त्याना आशा-निराशा पत्कराव्या लागल्या. दादोबा पांडुरंग स्वतः प्रार्थनासमाजाचे सभासद झाले नाहीत. मग जोतीबा बाहेरचे राहिले यात नवल नव्हे. परंतु दादोबांचे जे सात धर्मनिर्णय आहेत तीच लोकहितवादी-फुले वगैरे सर्व प्रबोधनकारांची मुख्य सूत्रे ठरतात :- (१) ईश्वर एक आणि तोच पूज्य (२) नीतिपूर्वक सप्रेम ईश्वरभक्ति हाच धर्म (३) मनुष्यमात्राचा पारमार्थिक धर्म एक होय (४) प्रत्येक मनुष्यास विचार करण्याचे स्वातंत्र्य आहे. (५) नित्य नैमित्तिक कर्मे विवेकास अनुसरून असावी (६) मनुष्यमात्राची एक ज्ञाती (७) सर्वास ज्ञानशिक्षा असावी.

धर्म हा विषम व पक्षपातमूलक नसावा यासाठी जोतीरावाना वेगळे खंडन करावे लागले. पण या खंडनाला आधार वरील सूत्रे होती. धर्म लोककल्याणाला व मानवी ऐक्याला कारणीभूत झाला पाहिजे. हे जोतीरावांच्या धर्मविवेचनाचे देखील मर्म लक्षात घेतले पाहिजे. शेवटी जोतीरावानी सार्वजनिक मानवधर्म सांगितला आहे. हेच त्यांचे शाश्वत स्वरूप. धर्मांतर का स्वधर्मशुद्धी ? हा त्या काळी ज्वलंत प्रश्न होता. या प्रश्नाला लोकहितवादी व फुले यानी धर्मशुद्धी हे उत्तर ठरविले.

ज्या कालप्रवाहातून व ( पुण्याच्या ) त्यावेळच्या परिस्थितीतून म. फुले यांची आयुष्यक्रमणिका झाली त्याच समान वस्तुस्थितीमधून व अनुभवातून लोकहितवादी हेदेखील गेले. त्या काळात ज्ञानसाधनेच्याही दृष्टीने ख्रिस्ती– व इंग्रज यांचा संबंध अटळ होता.

" Lokahitawadi used to avail himself of all opportunities of attending Lectures by English-men or missioneries in Kirkee ( खडकी ) or similar places near about the city of Poona. That always meant a cross–country walk for several miles ...... " [ Shri N. R. Phatak. Rationalists of Maharastra. page 5 ]

Gopalrao Deshmukh "Lokahitawadi" Rationalist and Reformer असे श्री. न. र. फाटक यांना दिसले; व तर्कतीर्थ गुरुवर्य लक्ष्मणशास्त्री जोशी याना Jyotirao Fule Rebel and Rationalist यथार्थाने दिसले. या विषयावर विचारप्रपंच करिताना लोकहितवादी-फुले यांच्या-मधील भेद लक्षात घेतला पाहिजे. पण दोघेही मराठी आधुनिक बुद्धिवादाचे महत्त्वाचे जनक ठरतात. मात्र "दोघेही ईश्वरवादी नव्हते," असे विधान करिता येत नाही.

जोतीरावानी स्वतः परकीय सरकाराची चाकरी पत्करली नाही तरी त्यांच्या बहु–समाजातील उमेदवाराना सरकारी नोकरीत संख्येच्या प्रमाणात स्थान लाभावे, हा प्रथम त्यांचाच विचार होय; व सन १८८५ ते १८९० पर्यंतची कॉंग्रेस देखील वरिष्ठ नोकऱ्यामध्ये हिंदी लोकाना योग्य स्थान असावे, असे हिरीरीने मागणे मागत होती. स्वतः लोकहितवादी "हिंदी" (Native) म्हणूनही लायकी असूनही त्यांना वरिष्ठ सरकारी जागा मिळू शकली नाही !

राममोहन पासूनच्या व लोकहितवादी-फुले यांच्या अखेरपर्यंतच्या धार्मिक व सामाजिक सुधारणा ह्या परप्रत्ययी व अनुकरणवादी आहेत असे म्हटले गेले. पण राष्ट्रीय सभेची कल्पना, "एका इंग्लिश माणसाच्या मेंदूत उदय पावली. ॲलन ऑक्टेव्हियन ह्यूम हे कॉंग्रेसचे जनक आहेत." [ कॉंग्रेसचा इतिहास डॉ. पट्टाभिसितारामय्या पान १७ ] ही राजकीय सुधारणांची प्रथमची अवस्था पाहिली तर जहालानी नंतरही लोकहितवादीफुले याना का नावे ठेविली ? वरील कॉंग्रेसच्या इतिहासात " आमचे ब्रिटिश मित्र " म्हणून अकरा मार्गदर्शक व साह्यकांची ओळख स्वतंत्र अशा पांचव्या प्रकरणात करून दिली आहे. म्हणून पुष्कळ सवंग व लोकप्रिय ठरलेली विधाने तपासून पुनः आता न्याय–अन्यायांचा निर्विकार बुद्धीने फेर विचार व्हावा. सामाजिक सुधारणांची व्याख्यादेखील शहरी व पांढरपेशीच किंवा मध्यमवर्गीय असून चालणार नाही. आगरकर व लोकहितवादी या दोघांचेही नाव गोपाळराव होते तरी विचारक्षितिजात फरक पुष्कळ होता.

देव आहे किंवा नाही, किंवा असला तर कसा आहे ? हा आजचा प्रश्न नाही. किंवा नवधर्मसंस्थापनेचाही हा काळ नव्हे ! अन्नवस्त्र–आसरा हा मुख्य सामाजिक व सर्वव्यापी यक्षप्रश्न आहे. दादोबा पांडुरंग पुढे बरेच निराश झाले व ते स्वीडनबर्ग नामक पारलौकिक पंथाचे अभ्यासक बनले. आत्म्याची मरणोत्तर गती वगैरे संबंधी भारतीय संस्कृतीतही तसले विचार आहेत. पण ह्यासारखा

अनुक्रमणिका

विचारप्रपंच करण्याचा हा काळ नव्हे. धर्मांतरे देखील आजचे प्रश्न सोडवू शकणार नाहीत. दारिद्र्यहरणार्थ आर्थिकदृष्टीच्या समाज-सुधारणांची आज गरज आहे. खऱ्या समाजवादी राजकारणाची या संदर्भात गरज आहे. विद्येत मागासलेले व विद्येत पुढारलेले असे दोन स्पष्ट भाग फुले-लोकहितवादींच्या काळात होते. लोकहितवादी इंग्रजी शिक्षणाची जरूरी जास्तीपणे सांगत होते. पण जनता संपूर्ण निरक्षर असल्यामुळे जोतीराव सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची मागणी करीत होते ! आजचे मागासलेपण मुख्यतः आर्थिक परिस्थितीवरून मोजणे, उत्तरोत्तर भाग पडत आहे. सर्व व्यवहारच निधर्मी म्हणजे इहवादी बनला आहे. लोकसंख्येला आळा घालणे हाही नव्या सामाजिक सुधारणेचा नवा भाग आहे. नागरी समान कायद्याची मागणी देखील नव्या सामाजिक सुधारणे-खाली येते. परमहंस सभेपासून ते आजपर्यंत समाज कसा बदलत आलेला आहे ते पाहाण्यासारखे आहे. ह्या बदलाला 'लोकहितवादी-फुले' कारण झाले. दोघानीही समाजसुधारणुकी संबंधीच्या विचारातून आर्थिक प्रगतीचा विवेक वगळलेला नव्हता. विज्ञान व पाश्चिमात्य नवी शास्त्रे यांचेही दोघानी स्वागत केले.

" साधुकी जात मत पुछीयो , पुछो उनका ग्यान ||
तलवार की किंमत किजिये , पडा रहन देव म्यान || "

—हे ध्येय सत्यशोधक समाजाच्या १८७६ सालच्या त्रैवार्षिक रिपोर्टाच्या पुस्तिकेवर छापलेले आढळते. 'जातिभेद मोडण्यासाठी' परमहंससभा निघाली, त्याचप्रमाणे सत्यशोधक समाजदेखील निघाला. जन्मजातीची समजूत व अभिनिवेश हृदयात दडला जातो; व मग परस्परात अलगता-पृथकता निर्माण होते. अस्पृश्यता हीदेखील जन्मप्राप्त जातीवरून ठरते. जोतीबांच्या सत्य-शोधक समाजाचे वरील ध्येयवाक्य विस्मृत आहे. दादोबा पांडुरंग हे वरील विवेकप्रवाहाचे एक पहिले संवेष्टे झाले. कोणताही लहान मोठा अव्वल इंग्रजी-तील सुधारक घेतला तरी त्याचा पूर्वसंबंध परमहंस सभेपर्यंत मागे जातो; व ह्या सिद्धांताला लोकहितवादी-फुले देखील अपवाद नव्हते. परमहंस सभेची राष्ट्रीय थोरवी आजच्याही संदर्भात मोठी आहे.

◇ ◆ ◆

अनुक्रमणिका

श्री. शं. बा. जोशी.

# महाभारतांतर्गत
## कथावस्तु आणि पात्रे यांचा मागोवा

### १ ) प्रस्ताव

महाभारताचा एकूण आशय कोणता ? आणि या एवढ्या बृहत्ग्रंथाच्या आशयाचा मागोवा घेणे शक्य आहे काय ? हे दोन प्रश्न मौलिक व महत्त्वाचे आहेत; पण हे प्रश्न धसाला लावून पाहण्याचे प्रयत्न झालेले माझ्या परिमित वाचनात आढळले नाहीत. डॉ. इरावतीबाई कर्वे यांचा 'युगान्त' हा ग्रंथ गाजला. यातील भीष्मादि पात्रे, मूळ महाभारतापेक्षा निराळी झाल्याची तक्रार ऐकू येते. पण खुद्द व्यासाच्या या पात्रसृष्टीचे स्फूर्तिस्थान कोठे आहे, हे तपासून पाहण्याची जरूरी कोणासही भासलेली दिसत नाही !

कोणत्याही साहित्यकलाकृतीच्या रचनाशिल्पाचे सौंदर्य, त्या कलाकृतीच्या मूल प्रतिकृतीच्या ( model ) तुलनेत जास्त सुस्पष्टपणे, प्रतीतीस येऊ शकते. पण अशा प्रकारच्या तुलनेत 'कलाबाह्य' मूल्ये डोकावण्याची भीती आहे ! महाभारताच्या संदर्भात नेमके हेच घडले आहे ! डॉ. इरावतीबाई कर्वे महाभारताच्या आ-शयाविषयीच शंकारूपी प्रश्न, वाचकापुढे उभा करतात : "मानवी प्रयत्न निष्फळ असतात, मानवी जीवन हे विफलच असायचे, हा धडा मनावर बिंबवण्यासाठी तर महाभारत रचलेले नाही ना ? असे ( त्याना ) सारा वेळ वाटे.' ( सत्यकथा, मार्च, ७३, पा. २७ )

आणखीही एका दृष्टीने डॉ. इरावतीबाईंचा प्रश्न महत्त्वाचा आहे : महाभारताच्या आशयाविषयी डॉ. इरावतीबाईनी आपले मत स्पष्ट सांगितले आहे. महाभारताची बैठक निर्-वेदी, जीवन वैफल्यवादी तात्त्विक भूमिकेवर आहे पण डॉ. इरावतीबाईंचा हा निष्कर्ष अमान्य असणारा वर्ग एक आहे : महाभारतांतर्गत भगवत्गीतेत प्रवृत्तिपर जीवनाचा उपदेश आहे, असे ठाम मत असणाऱ्याना, महाभारतग्रंथ एक शोकांतिका आहे असे वाटणार नाही. भारतात पर्यायाने मृत्युपूजा अभिप्रेत आहे, हा विचार, या वर्गाला अ-सह्य असणार !

अनुक्रमणिका

हा गीताग्रंथ, महाभारत काव्याची तात्विक भूमिका स्पष्ट करण्यासाठी अवश्य आहे; गीता, महाभारताचा अविभाज्य भाग होय, असे डॉ. एस्. वि. सुखटणकरांचे मत आहे. ( 'On Meaning of Mahabharata,' Publisher Bombay Branch of Royal Asiatic Society ग्रंथ पाहा ) या मतामुळे, डॉ. सुखटणकराना, डॉ. इरावतीबाईंचा महाभारताच्या आशयाविषयीचा निर्णय अमान्य असणार !

डॉ. सुखटणकरांनी महाभारताच्या पारायणात, मनन, चिंतनात आपले सबंध आयुष्य वेचले. आणि मेधावी, प्रतिभाशाली, उच्च दर्जाचे संशोधक म्हणून विख्यात ! डॉ इरावतीबाईंची योग्यताही अशीच थोर आहे. अशा दोन महान् धीमंतांपैकी कोणाचे मत, कोणाचा निष्कर्ष–विश्वासार्ह मानावयाचा ? आणि याला निकष कोणता ? महाभारतातील कथावस्तु, यातील पात्रे याची मूल आकृति ( archetype ) कोठे आहे हे निश्चित होईल तरच, डॉ. सुखटणकर वा डॉ. इरावतीबाई यांच्यापैकी कोणाचे मत खरे हे स्पष्ट होणे शक्य आहे. तरीपण हेही खरे की डॉ. सुखटणकरांची ' महाभारतातील अर्थ : आशयाविषयी ' झालेली व्याख्याने तपासल्यानेही, या दोघांचे निष्कर्ष जवळ जवळ, सारखे आहेत, हे कळणे शक्य आहे. पण महाभारत व गीता याविषयी स्पष्ट मतैक्य नसण्याचे प्रमुख कारण, डॉ. सुखटणकर, आपल्या व्याख्यानात बोलून जातात ! महाभारताचा खरा आशय तो, हाच ! ते म्हणतात :–

२) ही व्यासकृती एक ' यातु ( : Spell ) ' आहे !

डॉ. सुखटणकरांच्या व्याख्यानातील " We in India still stand under the spell of Mahabharata " ( p. 32 ), हे वाक्य महत्त्वाचे आहे. हा ग्रंथ यातु ( : spell ) स्वरूप आहे असे डॉ. सुखटणकरांच्या प्रातिभदृष्टीने हेरले; तरी यांच्यातील भावूक हृदयाने, संशोधक प्रतिभेवर विजय मिळवलेला दिसतो ! कारण, ' महाभारतात, भृगुसंप्रदायाचा हात सर्वत्र दिसतो ' हे मौलिक संशोधन करणारे डॉ. सुखटणकर, महाभारतातील या यातूचे प्रशंसक बनलेले दिसतात !

महाभारताचा ' शुद्ध ' पाठ शोधण्यासाठी, आपणास वाहून घेणाऱ्या डॉ. सुखटणकराना पुढे पुढे हे सर्व संशोधन विफल आहे, असे वाटू लागावे ! या विसंगतीचा अर्थ काय ? यानी, या व्याख्यानात स्पष्टीकरणार्थ घेतलेली अवतरणे त्यांच्याच ' शुद्ध ' पाठ म्हणून प्रसिद्ध झालेल्या भागातील नसावी; आणि संशोधनपूर्व महाभारत प्रतीलाच, डॉ. सुखटणकरांनी प्रशस्त मानावे, याचा

अन्वयार्थ, डॉ. नरहर कुरुंदकर यासारख्या व्यासंगी विद्वानानी स्पष्ट केला तर जास्त बरे. वरील विसंगतीचे कारण उघड होण्यात, या महाभारताचे रचनावैशिष्टचही प्रकाशात येण्याची शक्यता आहे. डॉ. सुखटणकरांच्या व्याख्यानात वैफल्याची भावना प्रतीतीस येते ! पण डॉ. कर्व्यांप्रमाणे निश्चित व स्पष्ट शब्दात ती व्यक्त झाली नाही. तरीपण प्रस्तावनेत, प्रकाशकानी, वरील विसंगतीकडे प्राज्ञांचे लक्ष वेधले आहे: A scholar of Dr. Sukhatankars eminence who spent a lifetime in practicing the Analytical approach to the study of Mahabharata appears to end up with what is tantemount to its negation (p. IX). यासाठी असे म्हणावेसे वाटते, की डॉ. इरावतीबाईंच्या महाभारतांच्या आशयाविषयीच्या शंकारूपी प्रश्नाचे उत्तर डॉ. सुखटणकरांच्या या वैफल्यभावनेत आढळेल.

## ३ ) डॉ. इरावतीबाईचा निष्कर्ष आणि डॉ. सुखटणकरांच्या संशोधनातील फलितांश हे दोनी समान आहेत !

महाभारताच्या आशय व आकृतिसौंदर्याविषयीची, या दोघांच्या निष्कर्षातील अंत:संगती नितांत रमणीय वाटल्याशिवाय राहणार नाही. पण दुःखद गोष्ट म्हणजे ही अंत:संगती स्पष्टपणे अजून उजेडात आलीच नाही. कारण, यांच्या संशोधनातील निष्कर्षाचा मौलिक भाग यानाच उमगलेला दिसत नाही ! याचे कारण असे की, हे दोघेही महाभारतातील यातुस्वरूपी 'नारायण' अस्त्राने, दिङमूढ झालेले दिसतात; त्यांच्या लिखाणातील विसंगतीत याचे प्रत्यंतर मिळते ! कारण असे की, या नारायण: नाग संप्रदायाच्या आचार व उच्चारांचा गाभा म्हणजेच अंतर्विसंगति ! सर्पगती कधी सरळ असू शकते काय ? माध्यम जसे, तसा आशयही होणारच ! *

डॉ. इरावतीबाई या आशयाविषयी शंका उभी करतात; पण त्या शंकेचा पाठपुरावा केलेला आढळत नाही ! या व्यासाने, निर्वेदी तत्त्वज्ञान जनमनावर बिंबवण्यासाठीच तर, मुद्दाम, हे महाभारत रचले नसेल काय ? या स्वरूपाच्या आपल्या प्रश्नाचे उत्तर पण त्यांना गवसले आहे ! या तीव्र सूक्ष्म दृष्टीच्या विदुषी; महाभारतातील सर्व पात्रांचा आढावा घेताना, व्यासाचे

* 'भारतीय संस्कृतीतील अंत:संगति वैशिष्टच' पाहा : 'नवभारत' नोव्हेंबर, १९७२.

रचनातंत्राचे, या यातुकृतीचे रहस्य, त्यांच्या लक्षात येते; एका सूत्रवाक्यात या तंत्राचा परिचय करून देतात: या महाकाव्यांतील प्रत्येक पात्र एक-एका प्रकारच्या वैफल्यभावनेनी व्यथित आहे; म्हणजे याचा अर्थ : "वैफल्य-भावना हाच या महाकाव्याचा स्थायी भाव होय!" (युगांत, पा. १६१).

वैफल्यभाव=अ-भाव. हे खरे असेल तर "अ-भाव हाच स्थायी" असणारे हे महाभारत, चक्क 'यातु' चा एक प्रकारच नव्हे तर दुसरे काय? निर्भेळ 'कलाकृती' या दृष्टीने जगातील साहित्यकृतीत हे महाभारत मेरुमणी म्हणता येईल. पण, अभाव हाच स्थायीभाव असणाऱ्या ग्रंथाला 'इतिहास' म्हणून संभ्रम उत्पन्न केला जाईल. तर हे यातुकृत्य ठरते! विश्वासार्ह तत्त्वज्ञान =पंचमवेद म्हणून मानण्यातही, यातील यातूचे अमोघ सामर्थ्यच सिद्ध होत आहे! आणि यातुप्रधान या पंचमवेदावरून, याच्या मूलस्रोतरूपी प्रचलित ऋक्संहितेचे 'गुपित'ही उघडकीस येत आहे.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे, डॉ. सुखटणकरांनाही, महाभारताची बैठक अ-भावाचीच असल्याची दाट शंका येते; "आता यापुढे संशोधन नको," असा इषारा, ते देतात! "... mere process of stripping off what we regarded as spurious will not automatically leave us with the pure and unalloyed "original." ( p. 30 ) डॉ. सुखटणकरांची ही भीती निराधार नव्हती. जुन्यातला जुना पाठ शोधण्यातच, हा महाग्रंथ इतका रोडावला आहे की या पुढील वैचारिक सुसंगतीच्या तपासणीत आमच्या हाती एक श्लोकही लागणार नाही अशी त्यांच्या मनाची खात्री पटते. कांद्यात घट्ट गाभा मिळेल अशा अंदाजाने सोलण्यात वैफल्य हे पदरी येणारच! म्हणून महाभारत ( व गीता ) यातील अंतर-विसंगतीही सुसंगतच म्हणून मानणे प्रशस्त होईल काय? असा आणखी एक प्रश्न पुढे येतो! उदा: गीतेतील एक दोन नमुने पहा : १ ) 'तस्मात् अपरिहार्ये अर्थे तत्र का परिदेवना?' असा उप-देश करणारा हा भगवंतच, पुढे 'जन्म-मृत्यु, जरा-व्याधीं'ची भीती घालून मोक्षमार्गपरायण होण्याची आवश्यकता पर्यायाने प्रतिपादन करतो! २ ) 'एतत् विमृश्य अशेषेण, यथेच्छसि तथा कुरु' असा सल्ला देणारा हा परमात्मा, 'सर्व धर्मान् परित्यज्य माम् एकं शरणं व्रज' अशी आज्ञा करतो! हा 'गुरु-शरणमार्ग आहे.' या संप्रदायात 'सर्वसमर्पण भावाची दास्यभक्ति हीच एकमेव प्रशस्त क्रिया असते.

"अमृतं चैव मृत्युः च, सत् असत् च' अशी परस्परविरोधी, विसंगत विधाने– 'ही व्यामिश्र शैली'– हेच या महाभारताचे वैशिष्ट असल्याने अमृत ( + ) व मृत्यु ( – ), सत् ( + ) व असत् ( – ) या दोहोंची गोळा-बेरीज, काही केले तरी, ० ( शून्य ) च होणार; ही बैठक अभावात्मकच ठरणार, हे अटळ आहे! अशा रचनावैशिष्ट्याच्या या ग्रंथाच्या संशोधनात 'शुद्ध'प्रत म्हणजे 'शून्य'च असणार!

एकूण, अशा प्रकारे, या दोघाही प्रतिभाशाली विद्वानांच्या निष्कर्षांत साम्य असून, हा एक प्रकारचा 'सत्य' संशोधनातला ताळा-पडताळाच होय. आणि या पडताळ्यात श्रेष्ठ कलाकृतीचे लक्षण प्रतीतीस येत आहे: हे महाभारत काव्य, 'आशय आणि आकृती या दोहोतील एकात्मता', 'Form is raised to the levell of content या उच्च पातळीवरील अमोघ-कृती असल्याचा दाखला, असा अभावितपणे, उपलब्ध होत आहे. आणि विमर्श-नांचे हे सूत्र, 'ब्रह्मानंदसहोदर'वादी, निवृत्तीपंथीयानीच प्रतिष्ठित केले असले पाहिजे, हेही उघड आहे.

## ४) डॉ. सुखटणकरांच्या संशोधनातून उजेडात येत असलेले आणखी एक 'गुपित'!

महाभारत रचनेत भृगूनी ढवळाढवळ केली आहे; ही गोष्ट डॉ. सुख-टणकरानी सप्रमाण सिद्ध केली आहे. पण डॉक्टरसाहेबाचा आपल्या संशोधना-विषयीचाच विश्वास उडाला! यामुळे संपूर्ण यशाचा टप्पा जवळ असूनही महाभारताच्या यातूच्या आहारी गेल्याने, डॉ. इरावतीबाईप्रमाणेच यशाचे श्रेय त्यानी थोडक्यात गमावले! महाभारतात आपले श्लोक घुसडणाऱ्या भृगुसंप्र-दायाचा आणखी पुढे मागोवा घेतला असता तर महाभारतांतील स्थित्यंतराचे कोडे उलगडल्याचे संपूर्ण श्रेय यांचे झाले असते!

भृगूंच्या पूर्ववृत्तांतासाठी उपनिषदे व वेदाकडे जाणे जरूर आहे. भृग्वंगिर-सांचा वेद म्हणजे अथर्ववेद! 'अथर्ववेदी' संप्रदाय, यातुकृत्याविषयी सुप्रसिद्ध होता. 'भृग्वंगिरस' या जोड नावांतील 'अंगिर' वंश पूर्वी जातवेद अग्नी संप्रदायाचा. अग्नी (Ignite) हा युरो-भारती भाषेतला संकेत होय. अंगिर ऋषी (अंगार) अग्निपूजक म्हणण्यात औचित्य आहे - 'अंगिर' हा संकेत पुढे 'अंगिरस' होतो! पण, अथर्ववेदाशी संबंधित अंगिरस वंशीय, आपः रस पंथीय, नचिकेत अग्नी (म्हणजे 'आप'मधील अग्नी) पूजक ठरतात. याना 'अथर्वांगिरसः' असेही म्हटले' आहे (अथर्ववेदीय प्रश्न उप. २.८).

हा अथर्ववेदीय अग्नी 'द्रव' स्वरूप होय. म्हणून नूतन संप्रदाय 'अंगानां रसः' स्वरूपी अग्नीचे आराधक असल्याचे उजेडांत येत आहे. 'अंगिरसः अंगानां हि रसः। प्राणो वा अंगानां रसः' (बृ. १.३.१९). अंगिरस नामक व्यक्तीचे हे नामरूप, जिवंत व्यक्तिवाचक नसून सांकेतिक असावे: एतं अंगरसं सन्तं अंगिराः इत्याक्षते (गोपथ ब्रा १.१.७). अशा 'अंगिरसां'शी निगडित असणारे 'भृगू' हे सुद्धा 'रस' स्वरूपी सांकेतिक नाव असावे असे म्हणावयास जागा आहे. कारण,

'रसो वै सः' या तत्त्वप्रतिपादक तैत्तिरीयोपनिषदांत, एक 'भृगु' येतो; हा 'वरुणपुत्र' म्हणवितो! 'भार्गवी वारुणी विद्या' प्रतिपादक हा 'भृगु' प्रच्छन्न वसिष्ठ असल्याची दाट शंका येते. 'वरुण' हे दैवत ऋग्वेदांत आहे. हा देव मुळात सौर दैवत मंडळात असावा. पुढे, हा आप: रस पंथीय दैवत झाल्याचे दिसून येते. या वरुणाचा पुत्र म्हणजे वसिष्ठच! वसिष्ठाला 'अथर्व निधि' अशी पदवी होती! म्हणजे वसिष्ठही यातुविद्याप्रवीणच ठरतो* 'वरुण' हा प्रच्छन्न चंद्र असल्याचे तज्ज्ञानी सिद्ध केले आहे. म्हणजे वसिष्ठ हा चांद्रसंप्रदाय प्रवर्तक होता. वसिष्ठाच्या पणतूने लिहिलेल्या महाभारतांत चंद्रवंशीय राजांची कथा आहे, हे सर्वांना मान्य आहे. म्हणून वसिष्ठपरंपरा पुढे चालवणारा व्यासही चांद्रसंप्रदाय उचलून धरीत असल्यास नवल नाही. ही 'नियोगी' संतानपरंपरा आहे.

महाभारताच्या नांदी श्लोकांतील समीकरण जमेस धरले तर, व्यास = (भृगु) = वसिष्ठ असे म्हणावे लागते: 'व्यासाय विष्णुरूपाय व्यासरूपाय विष्णवे। नमो वै ब्रह्मनिधये वसिष्ठाय नमो नमः। व्यास, वसिष्ठ, वाल्मीकी, भृगु ही वेगवेगळी नावे वाटली तरी 'एकं संतं... बहुधा कल्पयन्ति' या ऋग्वाक्याप्रमाणे हे सर्वही 'संत' 'समान रूप आकृतीचे' असावेत; नव्हे आहेत. भृगूचा सांगाती 'अंगिरस' या व्यक्तिनामावरून हे ओळखता येते. 'अंगानां रसः' म्हणणे गौण वाटू नये म्हणून, 'प्राणा वा ऋषयः' या विवरणांत येणाऱ्या उपनिषदांतील नामावलीत 'वसिष्ठ' ही आहे. (बृ. २. २-३) म्हणजे हा वसिष्ठ प्राण-रस ठरतो.

या वसिष्ठ–व्यास परंपरेचा हा 'पंचम वेद' = महाभारत = चांद्र संप्रदायी आहे: आप: रस = अंगानां रस = पूजकांचा आहे, असे डॉ. सुखटणकरांच्या संशोधनांतील, 'भृगू'चा मागोवा घेताना उघड होत आहे.

* 'अप्सरा: उर्वशी पुत्र वसिष्ठ कोण'? नवभारत, मार्च, ७३





५) हे महाभारत 'Thing in Itself स्वरूप आहे.

हा आप : रस, ब्रह्मस्वरूपी आहे. 'रसा'ला स्वतःची विशिष्ट आकृती नसते ! कठोपनिषदांतील या 'ब्रह्म' तत्त्वाचे माहात्म्य बोलके आहे : 'अणोरणीयान्, महतो महीयान् ... जंतोः निहितो गुहायाम् । हे 'गुहानिहित' सत् तत्व आहे– 'धातु–प्रसादात्' याचा महिमा जाणिवेच्या कक्षेत येतो ! ( क. २–१–२० ). महाभारताच्या बाह्य आकृतीच्या विश्लेषणात, डॉ. सुखटणकराना हार पत्करावी लागली, याचे कारण, हे महाभारत 'रसा'त्मक आहे हेच होय. हे तत्त्व वृत्रस्वरूपी आहे : वृत्ताकृती आहे. विश्वाला आलिंगणारे आहे ! हा ब्रह्मरूपी रस असा एकाच वेळी उभयस्वरूपी आहे. हे आकृतिरूप पिंड–ब्रह्मांड रूप आहे. महाभारतात सर्वत्र यातु > जादूचा संभ्रम प्रतीतीस येण्याचे ते कारण येथेच आहे : कर्ता व्यास, : कृति, : महाभारत व बोध : ज्ञान या तीनही गोष्टी 'धातु-प्रसादा'मुळेच आकलन होऊ शकणाऱ्या आहेत. या विश्वरूप : ब्रह्मस्वरूप = ब्रह्म-पुच्छाचे ( तै. उ. २३; बृ. १.२.३; १ जै. ३–३–२३ ) एकाच वेळी 'मूर्त व अमूर्त च पातळीवर दर्शन घडते. हा 'आपो वा अर्क'स्वरूप आहे;* यालाच 'ब्रह्म रस', = 'ब्रह्म तेज' म्हटले आहे ( कौ. उ. ३.५ ) हा 'अर्कच' त्यावेळी मूर्त 'पुष्प' ही आहे ( बृ. ६.४.१ ). हे आपः 'अ-मृत' ( म्हणजे जीवसत्त्व ) आहे म्हणूनच ऋग्वेदात 'अ-मृतस्य नाभि.' ( : केंद्र ) असा याचा निर्देश आहे.

या उल्लेखाच्या पार्श्वभूमीवर महाभारताची 'अ-मृतनाभी' म्हणजे श्री-मत्, भग-वत् गीता होय. नामौचित्यात यातील केंद्रस्थ हा 'व्यास' रूपी 'नारायण,' भगवंत कसा याचे स्पष्टीकरण आढळते. शिवलिंगाचे पर्याय नाव 'शिविष्ट' हे विष्णूलाही रूढ होते; या पार्श्वभूमीवर व्यास=विष्णू=वसिष्ठ ( : दक्षिणकपर्द ) हे समीकरण अर्थदायी ठरते. हा व्यास महाभारतरूपी विश्व-कर्ता, या विश्वातच सामावल्याने, विश्वरूपी महाभारताबाहेर आढळणार कसा ? ( विश्वः ) पुरि-शय : 'पुरुषः' नारायण : नाग म्हणजे हाच होय ? वर्तुलाकृती-रूप झालेला 'व्यास' आणि वृत्ताकृतीरूपी 'महाभारत,' या दोहोंना निराळे अस्तित्व नाही. आकृतीहून आशय निराळा नाही ! पंचमवेद म्हणविणाऱ्या महाभारताहून (मूल आकृति, प्रचलित) ऋग्वेदाची आकृति निराळी नाही !

* हे 'ब्रह्म' दर्शन घडविणाऱ्या वेदोपनिषदातील निर्देशांची 'खाण', आचार्य लिमये व प्रा. वाडेकर यानी परिश्रमपूर्वक संपादिलेल्या 'अष्टादश उपनिषदः' या ग्रंथात आढळेल. प्रकाशक, वैदिक संशोधन मंडळ, पुणे ९.

अनुक्रमणिका

हे ग्रंथ 'महद्-भूतस्यनिश्वसित' म्हणवितात. (बृ. २.४.१०). हा 'निश्वास' म्हणजे 'प्राण': आपःरसःरेत ! 'विष्णु' रूपाच्या वर्णनात या दैवताला 'एकोविष्णुः' हा 'महत्भूत पृथक्भूत' असून 'त्रीन् लोकान्' व्यापून उरणारा म्हटले आहे !

वैदिकदैवतांचे विवरण देणाऱ्या 'बृहत्-देवता' या ग्रंथात, 'सूक्त : स्तोत्र कर्ता कवि आणि त्याचा स्तोत्रविषय (दैवत) या दोहोत अभेदसंबंध असतो' असे एक स्पष्टीकरण आढळते. प्रक्रिया (process) व फलित (product) हे निराळे न मानण्याचे दंडक, ऋग्वेदाइतके प्राचीन ठरते ! पण कर्ता, प्रेरणा, व कृति, – ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय– या त्रिपुटीत ऐक्य कल्पिण्यात 'short circuit' होत आहे ! यामुळे जीवनातील अर्थप्रकाश लुप्त होण्यास, व अंधाराची उपासना करण्यास अवकाश कल्पिला गेलेला दिसतो ! पंचमवेद व प्रचलित ऋग्वेद हे चांद्रसंप्रदाय प्रेरक, पोषकग्रंथ आहेत, हे यापूर्वी पाहिलेच आहे ! यामुळे हा : रात्र : चंद्र : अंधार आराधकांचा संप्रदाय आहे, हे पुनः सांगणे अनावश्यक होय. महाभारतातील स्थायीभूत कथावस्तु आणि प्रमुख पात्रे यांच्या संदर्भातही या 'रात्र (: चंद्र)' उपासना वैशिष्ट्याचे पुरेपूर दर्शन घडणे शक्य आहे.

## ६) कथावस्तु विचार

'कृष्ण' महिमा महाभारताचा विषय आहे. 'कृष्ण' हा संकेत 'काळा' : अंधार या अर्थी रूढ आहे. 'अंधार' म्हणजे प्रकाशाचा अभाव; प्रकाश = जीवन; अंधार = मृत्यु; हा अर्थ सर्व पुरातन संस्कृतीत अभिप्रेत आहे. आपण कालरूपी मृत्युदैवत असल्याची कृष्णाची ही कबूली, वरील अर्थाना पुष्टी देत आहे. महाभारतात, 'कृष्ण' याचा सखा 'अर्जुन' या दोघांची जोडी अटळ आहे ! 'अर्जुन' या संकेताला 'शुभ्र' : प्रकाश असा अर्थ असल्याचे सर्वमान्य आहे. अर्जुनाच्या (म्हणजे प्रकाशाच्या) संदर्भाशिवाय, कृष्णाचा (म्हणजे अंधाराचा) महिमा तो काय कळणार ?

डॉ. इरावतीबाई कर्वे यांचा शोध : 'महाभारतात अ-भाव हाच स्थायी भाव आहे' हा किती मूलगामी महत्त्वाचा आहे, हे येथे पडताळून पाहण्याजोगे आहे. अ भावाला स्थायी कल्पून महाकाव्य रचण्याचे कसब जगातच अजब आहे ! महाभारत' कृती ही 'विश्वं दर्पण दृश्यमाननगरी'वत् केवळ एक आभास आहे, असे असून, डॉ. इरावतीबाई सारख्यांना या काव्यात 'एक इतिहास' ही दिसावा, हे आश्चर्य नव्हे काय ? हे काव्य मुळात 'जय'

नामक वीरगाथा आहे : इतिहास आहे, असे या ग्रंथातच सुचविले जाते; पण परस्परविरोधी गोष्टी एकाठिकाणी आणणे– कृष्णाबरोबर अर्जुन आणणे – अशा वैशिष्ट्याच्या या भूमिकेवर खोटे = खरे दृश्य दिसणे अनिवार्य आहे. 'जय' आणि 'पराजय' हे दोनी 'समान आकाराचे आहेत असे मला वाटते' हे वाक्य व्यासाने, 'धर्म' राजाच्या तोंडी घालून महाभारताचा खरा अर्थच त्याच्याकडून वदविला आहे! (युगांत पा. १६१) जय = पराजय म्हणजेही फलित शून्यच होय! 'आहे' आणि ते 'नाही' हे दोनी एकाच वेळी दिसणे म्हणजेच ही जादू > यातुकृति होय.

डॉ. इरावतीबाईंचा हा निष्कर्षच आणखी एका परीने डॉ. सुखटणकरांचाही आहे : वैचारिक विसंगतीच्या दृष्टीने तपासले तर, या महाभारतात शिल्लक काहीच राहणार नाही, अशा स्वरूपाची डॉ. सुखटणकरांची भीती अनाठायी नव्हे! 'भृगु'ची हातचलाखी डॉ. सुखटणकरांनी प्रकाशात आणून थोर उपकार केले आहेत. तैत्तिरीय उपनिषदातील भृगूची कृती चव्हाटयावर येण्याने डॉ. सुखटणकरांच्या शोधाची मौलिकता आणखी एका दिशेने सिद्ध होणार आहे.

आप : रसपंथापूर्वी, प्रथम कोणता संप्रदाय प्रचलित होता, आणि तो संप्रदाय मागे पडून, हा रसानंदीपंथ कसा व का फोफावतो, हे या 'भार्गवी वारुणी विद्ये'च्या तैत्तिरीय उपनिषदातील उल्लेखामुळे उघड होत आहे. सर्वप्रथम 'त्रयो वै व्याहृतय: ' होत्या, पण ऋग्वेदात उपनिषत्काली 'चतुर्थी' : चौथी एक नवी व्याहृती मान्य होऊ लागते (१.५). ही चौथी "महाचमस्य: प्रवेदयते।" चौथ्याची 'चमस' ही संज्ञा (सोम) पानपात्राचे नाव आहे! बिंब-प्रतिबिंब न्यायाने दिव्यलोकातील चंद्र ( : चंद्रा ), व भूलोकातील 'पान-पात्र' हे वेगळे नव्हे, – या संप्रदायाचरणात ऋग्वेदात 'महाकुल' 'चमस' पानाचे वर्णन येते ( १०.१६१ ) या रसानंदाची पार्श्वभूमी, मुळात शाक्त संप्रदायाची आहे! वेदात हा महाकुल > कौल म्हणवितो.

ही 'चतुर्थी' : 'चमस' : चंद्ररूपी व्याहृती 'मह:' म्हणून ओळखली जाते आणि 'मह इति चंद्रमा: ।' ही येथील कबूली महत्त्वाची आहे. म्हणून ही चंद्र ( चंद्रा ) रूपी चमसाराधना रात्री संप्रदायाची असावी हे उघड होत आहे. 'त्रयो वै व्याहृतय: ' हा सौर संप्रदाय होय! 'चंद्रमसा वाव सर्वाणि ज्योतींषि महीयन्ते' हा दावा, रात्रसंप्रदाय, दिन : प्रकाशपूजक संप्रदायापेक्षा श्रेष्ठ आहे, असे सुचवीत आहे. ही ( चंद्र ) 'ज्योती' द्रव-स्वरूपी असल्याचा

निर्देश याच उपनिषदात आहे : 'अप्सु ज्योतिः प्रतिष्ठितम् । ज्योतिषि आपः प्रतिष्ठिताः । ( ३.८ ) हा उल्लेख निःसंदिग्ध आहे. 'आपोज्योतिः' आणि हा ( ज्योतिः स्वरूप ) आप 'शिवतमो रसः' असला निर्वाळा ऋग्वेदात मिळतो. महाभारतातील घटनाप्रेरक द्रौपदी 'आपोज्योती' असल्याचे आनंद-तीर्थांच्या 'महाभारत तात्पर्य निर्णयातील "शंरूपेरतेवाऽपि– सा एव द्रौपदी नाम काली चंद्रा इति' उच्यते" या उल्लेखात येते ( २.१२९ ).

वेदोपनिषदातील 'आपो ज्योति' किंवा 'ज्योतिस्वरूप' हे "आप"च महाभारताची कथा-वस्तु म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. द्रौपदी– वायुपुत्र = पवमान सोम, हे तर खरेच; गंगा-शंतनु ही पात्रेही या दृष्टीने अभ्यसनीय आहेत.

७ प्रधानपात्रे

i) गंगा-शं-तनु, व भीष्म

या कथेची मूल आकृति ऋग्वेदात आहे (१०.७२.८.९) पंचम वेदांतील नियोगसंप्रदाय हा, ऋग्वेदातील अदिति : आदिमाता संप्रदायाची 'समर्थां-नुसार सुधारून वाढवलेली आवृत्ती होय. गंगा, कुंती, द्रौपदी समस्येचे उत्तर अदितीत आहे. 'पंचकं ना' या प्रातःस्मरणीय आदर्शांत द्रौपदी बरोबर सीताही आहे ! त्या रहस्याकरता, 'नवभारत' 'जानेवारी' ७२ अंक पाहा. अदितीला 'सलिल' स्वरूपी म्हटले आहे. 'अदिति' हे व्यक्तिविशिष्ट नाव नव्हे. 'अ-दिति संकेत 'एकं सत्' तत्त्वाचे प्रतीक आहे. हे तत्त्व विभागले जात नाही; जल : सलिल हे अखंडित, अविभाज्य आहे– तत्त्वतः ; म्हणून या सलिल तत्त्वाला जीविताचा प्रतिनिधी मानलेला दिसतो. 'जीवित' हे वैयक्तिकच; जन्म-मृत्युयुक्त आहे, म्हणून आप : रस पातळीवरील भूमिकेत जीवन=मृत्यु ! 'जन्म 'दाते म्हणविणारे माता–पिता मृत्युस्वरूप ठरतात ! आप : रस भूमिकेवर उभे असणारे, हे महाभारत मृत्यूची-मृत्युलोकाची सार्व-कालिक कथा आहे. ही भव–चक्राची कथा आहे. डॉ. सुखटणकराना महा-भारतात तीन पातळ्यावरील अर्थ दिसतो : १) भौतपातळीवर, व्यासानेच म्हटल्याप्रमाणे ही 'नार' अयनी' नरोत्तमाची कथा; २) या जीविताच्या बुडाशी दिसणारी नैतिक मूल्याची पातळी; आणि ३) तिसरी दिव्याध्यात्म-वादी तात्त्विक पातळी.

जसे, वेदातील 'अदिती' किंवा 'दक्ष' या 'जगतः पितरौ'ची नावे व्यक्तिवाचक नव्हेत, तसेच, पंचमवेदातील गंगा आणि शं-तनु हीसुद्धा व्यक्ति-

वाचक नव्हत ! सृजनतत्त्वसूचक स्त्री व पुंशक्तीच्या या शब्दप्रतिमा होत. दिव्य लोकांची गंगा, जलस्वरूपी होय. या देवीला 'सलिल' म्हणण्यात, एकाचवेळी 'मूर्त च अ-मूर्त च,' बिंब-प्रतिबिंबरूपी सार्वकालिक पातळीवरील तत्त्वदर्शन घडविण्याचा उद्देश दिसतो. हा सलिल शब्द श्लेषार्थ युक्त आहे. ऋग्वेदातील 'सलिल,' यजुर्वेदात 'सरिल' होते; पुढे सरिर' ( : शरीर) रूप आढळते (बा. उ. १४).

स्त्री; सलिल ( : शरीर), तर पौंस्यदानी शं-तनु ! सुखदायी शरीर ! आणि यांच्या संयोगात जन्मणारा 'भीष्म' हा 'अष्टम' म्हणून सांगण्यात मृत्युस्वरूप तत्त्वाची सूचना आहे. वेदांत हा 'मार्तंड' (मृतात् अंडात् जात : ) म्हणवितो. मृत्युमुखी पडणाऱ्या प्रजननाचे समीक्षण हे याचे कार्य ! आणि 'आपोवत्स' : मार्तंड हे प्रच्छन्नचंद्राचे पर्यायी नाव आहे ! अशाप्रकारे ही तीनी प्रमुख पात्रे चांद्रभूमिकेवरची आहेत; या तीनीत 'भीष्म' तर साक्षात् चंद्राचा पर्याय आहे.

ii ) म. भारताची पाळे-मुळे ऋग्वेदात आहेत; या दृष्टीने वेदातील इंद्र व विष्णु आणि महाभारतातील अर्जुन व कृष्ण ही जोडी तुलनीय आहे. अर्जुन हा इंद्रांश इंद्रपुत्र, असे मानले जाते; वेदातील मूळ इंद्र हा अहि = वृत्रहन् दैवत आहे. 'वृत्र' संकेताला अंधार, पाणी, सर्वावरक दुष्ट शक्ती —मृत्यु स्वरूप म्हणून अर्थ आहेत; आणि वृत्र = अहि हा चंद्राचा पर्याय आहे. ( Vedic Mythology इंद्र पाहा ) या पार्श्वभूमीवर अहिवृत्र हा 'चंद्र' म्हटले तर याच्या उलट ( वृत्रहन् : ) इंद्र म्हणजे हा सवितृ = सूर्य ठरतो. हा तर्क नव्हे, वेदातच आधार आहे. ( II. ३०.१; १०.८९.२ ) शिवाय 'प्रकाश' ( इंद्र ) येताच, अंधार ( वृत्र ) मारला जाणे, ही नैसर्गिक क्रिया आहे. यावरून अहि:वृत्रहन् इंद्र हा प्रकाशस्वरूप संकेत आहे हे सिद्ध आहे. म्हणून इंद्राचा मित्र : 'इंद्रस्य युज्य: सखा' म्हणविणारा हा विष्णु अंधार, चंद्र, सर्प, पर्यायी वृत्रस्वरूपी झाला ! 'एको विष्णु: — —' या संकल्पमंत्रात विष्णूचे विश्वव्यापी 'वृत्र' स्वरूपाचे वर्णन येते. लोककंटक प्रकाशाचा शत्रु वृत्राचा संहार करून, जगावर उपकार केले, असे वर्णिला जाणारा हा इंद्रच, महाभारत पुराणांतरी दुष्ट शक्तीचा प्रतीक होतो ! वाल्मीकी ( : सर्प ) हा इंद्राला व्यभिचारी ठरवण्यातील अंतःसंगती, 'प्रकाशा'चे शत्रुत्व असणाऱ्या मृत्युपूजकांचे कृत्य आहे, हे जाहीर करत आहे !

वेदात, इंद्राचा ( : प्रकाशाचा ) मित्र विष्णु ( : चंद्र = अंधार ) असे म्हणण्यात औचित्य आहे. एक नैसर्गिक घटनाच येथे अभिप्रेत आहे.

पण, ही जोडी उलटी करून विष्णूचा (अंधाराचा) मित्र इंद्र (: प्रकाश), असे म्हणण्यात विसंगती आहे. प्रकाशाचा अभाव म्हणजे अंधार; 'आहे' या संदर्भातच, 'नाही' हे उत्तर संभवते. वस्त्र विणताना उलटी वीणच प्रथम, म्हटले तर ते वस्त्र विणले जाणे शक्य नाही. वेदामधे (जीवन) वस्त्रपट विणण्याचे सूचक उल्लेख येतात. सूर्य (सुलट) व, चंद्र (उलट) अशी ही सुलट–उलट वीण चालली आहे; म्हणून दिक्–काल–परिसराच्या पार्श्वभूमीवर मानव जीवन : संस्कृति स्वरूपी हे महावस्त्र विणले जात आहे! *

पण जीवन वैफल्यवादी दृष्टिकोनाला, मानवी जीवन आभासात्मक आहे, असे सिद्ध करण्याकरता, जीवनवस्त्राची ही उलटी वीण म्हणजे अभाव हाच स्थायीभाव कल्पिणे अटळ झालेले दिसते! संगीतात प्रथम आघात; नंतर अभाव हा क्रम उलटा केला तर हे (जीवन) संगीत 'निःशब्द ब्रह्म' लोकीचे = मृत्युलोकीचेच असणार.

महाभारतात, खरोखर वेदाप्रमाणे अर्जुनाचा (: इंद्र) सखा कृष्ण (विष्णु) असे न सांगता या पंचमवेदांत हा उलटा प्रकार येथे स्वीकारलेला दिसतो! म्हणून, 'आहे' हा आभास निर्माण करून, खरोखर येथे 'कांहीच नाही' अशी भावना बलवत्तर करण्याला हे उलटे तंत्र वापरलेले उजेडांत येत आहे. डॉ. इरावतीबाईंना आलेली दाट शंका : 'हे मानवी जीवन विफल असायचेच, असे मनावर बिंबवण्यासाठी तर हे महाभारत (मुद्दाम) रचलेले नाही ना', असे त्यांना सारा वेळ वाटे, (युगांत पा. २६), ते निष्कारण नव्हते.



* हे, सारे ऋग्वेदांतील मूल प्रतिमांच्या तुलनात्मक समीक्षेत उघडकीस येणार आहे. उपलब्ध ऋग्वेदांतील प्रकाशतत्त्वाधिष्ठित प्रतिमा आप : रस पंथीय भूमिकेला जुळतील अशा स्वरूपांत बदललेल्या दिसतात. 'इंद्र' हा इंद्रिय स्वरूपीही झालेला दिसेल. तरी त्यांतील तेज तत्त्व पूर्ण लुप्त होणे शक्य नसल्याने, त्या ओळखून मूल रूप जाणणे अशक्य नाही.

श्री. मधुकर गडकरी

# आपल्या पूर्वजांचा परिचय करून देणारा चार्लस् डार्विन

मनुष्ययोनीची उत्पत्ती कशी झाली याविषयी प्राचीन काळी अनेक प्रकारच्या कल्पना चालू होत्या. प्रत्येक कल्पनेचे अभिमानी लोक जगात नांदत होते. जो कोणी एखादी कल्पना काढी, तो आपल्या कल्पनेची युक्तता सर्वांना पटवून देत असे म्हणून नव्हे; तर राजकारण, धर्म, समाजसुधारणा अशासारख्या एखाद्या विषयांत त्याचा महिमा प्रस्थापित झालेला असे, म्हणूनच त्याची ती कल्पना लोक मान्य करीत. पण वस्तुस्थिती अशी की, 'असे कशावरून ?' असे खडसावून विचारण्याची ऊर्मीच कित्येक शतकांपर्यंत लोकांच्या मनात उत्पन्न झाली नाही. ती झाल्यावर चिकित्सेचे युग सुरू झाले. त्यात अनेक जुन्या कल्पना साफ ढासळल्या. मग बुद्धिप्रामाण्यवादी लोक नव्या कल्पना बांधू लागले.

डार्विन हा 'बीगल' नामक जहाजांतून न जाता, तर तो धर्मोपदेशक झाला असता. मानवाच्या उत्क्रांतीवरील त्याच्या युगप्रवर्तक संशोधनाला जग मुकले असते व या शोधामुळे इतिहास समृद्ध झाला तसा झाला नसता. डार्विन वस्तुतः धर्मोपाध्यायच व्हावयाचा; पण थोडक्यांत चुकले. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभी मस्तिष्कशास्त्राचा फार बोलबाला होता. एका मस्तिष्कशास्त्रज्ञाने डार्विनचे डोके तपासून सांगितले की, तो धर्माचा मोठा आधारस्तंभ होईल. कारण त्याला त्याच्या डोक्यांतला धर्मशास्त्रदर्शक भाग चांगलाच वर आलेला दिसला. दहा सामान्य धर्मोपाध्यायांच्या डोक्यांतल्या भागाइतका भाग एकट्याच्या डोक्यांत त्या मस्तिष्कशास्त्र्याला आढळला. डार्विनचे नाक तसेच त्याचे डोके त्याला सरळ इंग्लंडमधील चर्चच्या सिंहासनावर नेऊन बसविणार असे दिसत असता, मानवजातीच्या सुदैवाने कप्तानाचे डार्विनच्या नाकाबद्दलचे मत बदलेले व डार्विनला 'बीगल' गलबतावर जागा मिळाली, त्याने बायबल

मिटले, ह्यातील सृष्टिनिर्मितीच्या कल्पित कथा सोडून दिल्या व साता-समुद्रात फिरून पशुपक्षात, फळाफुलात, वृक्षवनस्पतीत जगाचा इतिहास पाहाण्याचा प्रारंभ केला. जगाच्या इतिहासावरील प्रवचने दगडाधोंड्यातून, नद्यांतून, वाळवंटातून व पर्वतांतून ऐकत तो सर्वत्र हिंडला. किती मनोरंजक व सत्यमय ही जगाची कथा! परत आल्यावर पूर्वी धर्मोपदेशक होऊ इच्छित असलेलाच डार्विन ज्या आधारावर चर्चची उभारणी झाली होती, त्या आधाराच्याच सत्यतेविषयी शंका घेऊ लागला. त्यानें आव्हान दिले. अदृश्य स्वर्गाचा अभ्यास व परलोकाचा विचार सोडून देऊन तो प्रत्यक्ष पृथ्वीचा अभ्यास करू लागला. जग एका धर्मोपदेशकाला मुकले खरे; पण जगाला एक अत्यंत मोठा शास्त्रज्ञ लाभला.

ग्रीक संस्कृती बुडाली आणि पुढे दोन सहस्रवर्षे पर्यंत जीवोत्पत्ती कशी झाली या संबंधीचा एकही नवा विचार कोणाला सांगता आला नाही. सारे पंडित, धर्मवेत्ते, कवी, हे बायबलांतील उत्पत्तिकथाच प्रमाण मानीत राहिले. ही कथा एवढीच आहे की, प्राण्यांच्या सर्व जाती परमेश्वराने पृथक् पृथक्पणे निर्मिल्या. त्यांची रूपे निर्मितीच्या वेळी जशी होती तशीच आजही आहेत. या दोन हजार वर्षात सृष्टिज्ञानासंबंधाने माणसाच्या मेंदूत कसलीही हालचाल झाली नाही! जे बायबलातील मत प्रमाण मानीत ते म्हणत की, "निरनिराळे प्राणी कसल्यातरी नासक्या वस्तूतून निघालेले असतात. घोडा मेला म्हणजे त्याच्या कुजक्या अंगातून गांधिलमाशा निघतात; मेलेल्या खेचराच्या अंगातून चावऱ्या माशा निघतात; आंबलेल्या चक्क्यातून उंदीर निघतात!" परंतु या सर्वाचा अर्थ इतकाच दिसतो की, प्रजा कोठून व कशी उत्पन्न झाली हे आपल्याला माहीत नाही, येवढेच या कथा लिहिणाऱ्यांना म्हणावयाचे असते. गोष्ट सांगत असताना, जसे आपण म्हणतो की, "तिकडून आला एक कोल्हा तसेच हे आहे" 'तिकडून' म्हणजे कोणीकडन हे आपल्याला माहीत नसते. ऐकणाऱ्यालाही ते कळते. वर दिलेल्या उत्पत्तिकथासुद्धा याच पद्धतीने पत्करावयाच्या हे सर्वच ओळखतात.

अठराव्या शतकात मोठाच फरक पडला. तार्किकांच्या हाती नवे नवे साहित्य आले. निरीक्षणाचा महिमा लोकांना जास्त वाटू लागला. निरीक्षणावरून अनुमाने निघू लागली. अनुमानांनी नव्या शास्त्रांचा आरंभ करून दिला. स्वीडन्मध्ये कार्नलिनिअस् या नावाचा एक सृष्टपदार्थांचा अभ्यासक झाला. नवी अनुमाने काढणे किंवा प्रमेये बांधणे यांच्या नादी तो लागला नाही. सृष्ट पदार्थांची जातवारी अथवा वर्गवारी करण्यातच त्याचे मन दंग होऊन गेले.

प्राण्यांच्या निरनिराळ्या जाती त्याने दाखवून दिल्या. किडा, मुंगी, पशु पक्षी जे काय सापडेल ते, कोणत्यातरी ठराविक कोष्टकात जाऊन पडले पाहिजे असा त्याचा आग्रह असे. तो म्हणे की, जेव्हा देवाने सृष्टी निर्माण केली, तेव्हा एका एका जातीचे एक जोडपे त्याने निर्माण केले. या जोडप्यापासूनच सध्याच्या त्या जातीच्या प्रजा झाल्या आहेत. अगदी पहिल्या जोडप्यात जे गुण होते, तेच त्या जोडप्यांच्या सध्याच्या प्रजातही असले पाहिजेत. कोणत्याही जातीत कसलाही फरक आजपर्यंत झालेला नाही. नवलाची गोष्ट अशी की, लिनिअस्चे हे मत शेवटी अगदी बदलले आणि संकराने निरनिराळ्या जाती उत्पन्न होऊ शकतात असे त्यास वाटू लागले. तिकडे स्विडनमध्ये हा प्रकार चालू असताना इकडे इंग्लंडात इरॅस्मस् डार्विन म्हणजे चॉर्लस् डार्विनचा आजा याने 'झूनोमिया' या नावाचे एक काव्य लिहिले. त्यात प्राण्याचा जन्म व त्याची उत्क्रांती कधी झाली असेल, या विषयीच्या काही कल्पना सुचल्या तशा त्याने सांगितल्या. चमत्कार हा की, पुढे नातवाने जे सिद्धान्त प्रस्थापित केले, त्यांची स्थूलरूप मूलतत्त्वे या कवितेत सापडतात. जीवनार्थ कलह, सर्व सृष्टीचा एकाच उगमस्थानातून उद्‌भव, अधिक बळकट व अधिक सुंदर अशा नराबद्दल माद्यांच्या ठायी दिसणारी पसंती व स्वसंरक्षणासाठी प्राण्यांनी उत्पन्न केलेले रंगाचे वैचित्र्य, हे सारे विषय इरॅस्मस् डार्विनच्या या कवितेत आले होते. उत्क्रांतीतील मुख्य सूत्र त्याच्या मताने हे होते की, कोणत्याही अवयवांचा वाढता वापर होत असतो, किंवा त्यांचा वापर बंद पडतो व त्याचे परिणाम पुढील अपत्याला जाऊन पोहचतात. यातूनच आशा, आकांक्षा, इच्छा इत्यादि सर्व वासना उत्पन्न होतात. हे त्याचे बोलणे ऐकून तेव्हाचे लोक त्याला हसू लागले, त्यांनी त्याला मूर्खातच जमा केले. फरान्समध्येही जॉर्ज बफन् या नावाच्या तत्त्ववेत्त्याने जीवोत्पत्तीचा शोध चालविला होता. तो सांगू लागला की, जो जो जीवश्रेणी लांबत जाईल, तो तो प्राण्यात फरक पडत जातो. जगण्यासाठी प्राण्यांना कलह करावा लागतो; आणि प्राण्यांचे जे स्वसंपादित गुण असतात ते पुढच्या पिढीला जाऊन पोहचतात. भोवतालचे लोक बफन्‌ला म्हणाले, "हे तुझे सारे पाखंड आम्हाला ऐकवत नाही. तू आमच्यातून निघून जा." त्याला त्यानी वाळीत टाकले. शेवटी बफन्‌ला अगदी नकोसे झाले; त्याने लिहून दिले की, "सृष्टीच्या रचनेसंबंधाने धर्मग्रंथात सांगितलेल्या विरुद्ध मी जे जे काही लिहिले आहे त्यांचा मी त्याग करतो." याच सुमारास फरान्स देशात लामार्क याचा उदय झाला. त्याने प्राण्यांच्या उत्पत्तीसंबंधाने काही नव्या कल्पना सुनिश्चितपणे मांडल्या. त्यालाही लोकांनी वाळीत टाकले. त्याला कोणी जवळच

करीना. त्याला खायला मिळेना. पण हा सारा जाच शास्त्रीय सत्यासाठी त्याने सहन केला. तो जिवंत असेतोपर्यंत त्याची प्रमेये फारशी कोणाला पटली नाहीत. पुढे पन्नास वर्षांनी डार्विन उदयास आला; आणि साऱ्या जगाने त्याचा जयजयकार केला. लामार्कची मते चांगली सुसंबद्ध होती. इतकी की, डार्विनने आपल्या ग्रंथाच्या पुढल्या पुढल्या आवृत्तीत त्याच्या काही मुद्द्यांचा अंतर्भावही केला आहे. दुर्दैवाची गोष्ट एवढीच की, मते बनविण्याची लामार्कची पद्धती चुकीची असे. त्यामुळे त्याचे जे खरे सिद्धांत होते त्यांनासुद्धा समकालीन लोकांनी मान्यता दिली नाही. त्याने चार न्याय सांगितले : १ ) पहिला न्याय म्हणजे प्रत्येक सजीव शरीराचा आकार वाढवीत नेण्याकडे जीवाची प्रवृत्ती असते; शरीराच्या अवयवांचा आकारही असाच वाढत जातो; व ही वाढ अवश्य त्या मर्यादेपर्यंत पोहचली म्हणजे थांबते. २ ) प्राण्यांच्या ठिकाणी नवीन वांछा उत्पन्न झाल्या म्हणजे त्यांच्या ठिकाणी नवीन इंद्रिये उत्पन्न होतात. ३ ) इंद्रियांचा उपयोग होत जाईल तसतशी ती विकसित होत जातात. व ४ ) प्राण्यांत पडलेले नवे फरक अपत्यांना जाऊन पोहचतात. या चार नियमांपैकी पहिला, तिसरा व चौथा हे कोणत्या ना कोणत्या रूपाने शास्त्रीयता पावले. पण दुसरा नियम लामार्क याला फारच बाधला.

प्राण्याच्या वंशावळीला नेहमी फाटे फुटतात. ती एकाच रेषेने चालत नाही. हे दाखविणारा पहिला उत्क्रांतिवादी लामार्कच होय. अशा फांद्या दाखविणाऱ्या प्राण्यांचा वंशवृक्षही त्याने प्रसिद्ध केलेला होता. संशोधनाच्या कामात आणि त्या संशोधनाचा प्रपंच करण्याच्या कामात लामार्कने दाखविलेला संयमही फार वाखाणण्यासारखा आहे असे तज्ज्ञांचे मत आहे. त्याच्या आधी होऊन गेलेल्या प्राणिशास्त्रज्ञांची मते वाचली म्हणजे लामार्क याला शास्त्रज्ञ ही पदवी देण्यास काहीच हरकत वाटू नये. उदा. क्लॉउ डचुरे हा असे सांगत असे की, " सरोवराच्या काठावर वाढलेल्या एका झाडाची पाने जर पाण्यात पडली तर त्याचे मासे होतात व जमिनीवर पडली तर त्याची पाखरे होतात. " अशा अज्ञानातून लामार्कला बाहेर पडावयाचे होते. १८०९ साली 'Philosophy of Zoology' या नावाचा आपला ग्रंथ त्याने प्रसिद्ध केला व त्याच वर्षी उत्क्रांतितत्त्वाचा महान प्रणेता डार्विन हा जन्माला आला.

डार्विन व एब्राहम लिंकन एकाच दिवशी १२ फेब्रुवारी १८०९ रोजी जन्मल्यामुळे प्रोफेसर लॅल् म्हणे की, लिंकनने मानवांचे देह गुलामगिरीतून मुक्त केले, त्याप्रमाणे डार्विनने मानवी मन अज्ञानाच्या बंधनापासून मुक्त केले.

१८०९ साल महापुरुषांच्या जन्मांनी भरलेले आहे. या वर्षी निसर्गाने मानव-जातीच्या मांडीवर जणु महापुरुषांचे ताटच वाढून ठेविले. डार्विन, लिंकन, गॉड्स्ट्, मेंडेलसन्, चॉपिन, पो, टेनिसन, ऑलिव्हर, एलिझाबेथ, बेरेट, ब्राउनिंग या सर्वांचा जन्म याच वर्षी झाला. आणखीही कित्येक याच साली जन्मले असतील. यांपैकी प्रत्येकाने मानवजातीला शाश्वत सुंदरतेची व उदात्ततेची जोड करून दिली आहे, त्यात भरपूर भर घातली आहे; डार्विनने घातलेली भरही काही कमी नव्हती.

डार्विनचे मातृकुल व पितृकुल दोन्ही चांगली होती. त्याच्या वडिलांचे वडील इरॅस्मस् डार्विन हे प्रसिद्ध निसर्गशास्त्री होते. त्यांनी "वनस्पतींच्या प्रेमलीला" हे काव्य तसेच 'सेंद्रिय जीवनाचे नियम' ( Lows of Organic Life ) हे पुस्तक लिहिले. त्याचे आईकडचे पणजोबा चिनी मातीच्या भांड्यांचे मोठे कारखानदार होते. त्यांचे नाव जोशिया वेजवुड. शास्त्रे व कला ह्यात खूप रस घेणारे वातावरण डार्विनच्या घरात असणे साहजिकच आहे, लहानपणी डार्विन सौम्यवृत्तीचा व चिंतनशील होता. त्याला लहान लहान खडे, दगड, शिंपले, नाणी, फुले, कृमी, जीवजंतू, पक्ष्यांची अंडी, कीटक वगैरे जमविण्याचा फार नाद होता. तो जिवंत कीटक पकडीत नसे, मेलेले आढळले तरच उचली. फुलपाखरांसही तो मारीत नसे. पण पक्षी मात्र आपल्या छोट्या बंदुकीने तो खुशाल मारी ! दुरून जीव घेण्यात त्याच्या बालमनाला जणू हरकत वाटत नसावी. पुष्कळ वर्षे त्याला शिकारीचा नाद होता. पण एके दिवशी एका जखमी पक्षाच्या वेदना पाहून त्याच्या मनावर खूप परिणाम झाला व केवळ करमणुकीखातर पुनः प्राण्यांची हिंसा करावयाची नाही असा निश्चय त्याने केला. त्याची आई तो आठ वर्षांचा असता वारली. त्याचा बाप रॉबर्ट डार्विन हा भीमकाय पुरुष होता. तो अत्यंत आनंदी व कार्यक्षम होता, पण त्याला पुत्राचा स्वभाव मात्र नीट समजला नाही. तो निरुपयोगी, उडाण-टप्पू आहे असे त्याचे मत होते. जगातला सारा केरकचरा–फुले, पाखरे, दगडधोंडे घरात आणून भरणारा हा पोरगा पुढे काय करणार, असे त्याला वाटे. मुलाच्या हातून काही कर्तबगारी होईल असे बापास वाटेना. त्याच्या डोक्यात थोडेफार जुने ज्ञान कोंबण्यासाठी बापानें त्याला ग्रीक व लॅटिन शिकविणाऱ्या एका शाळेत घातले. पण मुलाने शिक्षणाकडे लक्ष न देता बापाच्या बागेतच एक गुप्त प्रयोगशाळा सुरू करून रसायनशास्त्राचे व पदार्थविज्ञानाचे प्रयोग चालविले, त्यामुळे त्याला सारेजण वेडपट म्हणू लागले. मुले त्याला "गॅस" म्हणत. हेडमास्तरांनी त्याला 'निष्काळजी माणूस' ही पदवी दिली. मुलाच्या

या प्रयोगामुळे व उंदीर पकडण्याच्या खेळामुळे विटून व घाबरून बापाने त्याला क्लासिकल शाळेतून काढून घेऊन एडिंवरो येथे वैद्यकीचा अभ्यास करण्यास पाठविले.

पित्याच्या धंद्याचे शिक्षण घेण्यात डार्विन थोडा वेळ रमला, पण ॲनॉटमीची व्याख्याने त्याला कंटाळवाणी वाटू लागली. शस्त्रक्रियेचे प्रयोगही त्याला बघवेनात. एका मुलावर करण्यात येत असलेली शस्त्रक्रिया पाहून डार्विन खोलीतून पळून गेला. त्या वेळी गुंगी आणणारा क्लोरोफॉर्म नसल्या-मुळे तो मुलगा फोडीत असलेल्या किंकाळचा पुढे कित्येक वर्षे तो विसरू शकला नाही. गटेप्रमाणेच तो वर्गात फारसे शिकला नाही. तो शाळेबाहेरच बरेचसे शिकला. तो दारू पीत असे, जुगार खेळे, प्रेम करी. हे सर्व करीत असता तो आपल्या अजबखान्यात अधिकाधिक वस्तूंची भर घाली. "मुलगा डॉक्टर होणे शक्य नाही" असे वाटल्यामुळे बापाने त्याला धर्मोपदेशक करावयाचे ठरवून केंब्रिजच्या खिश्चन कॉलेजात घातले. त्यावेळी तो केवळ अठरा वर्षांचा होता. येथे तो तीन वर्षे होता. "ही तीन वर्षे फुकट गेली, नुसती फुकट जाती तर बरे, पण प्रार्थना, दारू पिणे, गाणे, पत्ते खेळणे या आणखी काही गोष्टी त्यात होत्या."

बीगल नावाचे एक सरकारी जहाज दक्षिण अमेरिकेतील समुद्रात मोठी सफर करावयास निघाले. या जहाजावर सृष्ट पदार्थांचा अभ्यास करणारा कोणीतरी माणूस कप्तानाला हवा होता. चार्लस्‌ने बापाला विचारले, पण बाप म्हणाला की," जर का तू या उद्योगात पडलास तर उपाध्येपणाची दीक्षा तुला कधी मिळणार नाही! परंतु चार्लस्‌च्या चुलत्याने त्याच्या बापाची समजूत पाडली की, सृष्ट पदार्थांचा अभ्यास केला म्हणून उपाध्येपणाच्या दीक्षेला बाध येण्यासारखा नाही. भूगर्भशास्त्राचा त्याचा गुरुजी हेन्सलो यानेही बीगलच्या कप्तानाशी बोलणे केले. चार्लस् डार्विन कप्तानाला जाऊन भेटला. पुढे डार्विन मोठा झाला व त्याने आपले उत्क्रांतितत्त्व जगापुढे मांडले. तेव्हा हा कप्तान रागाने अगदी बेफाम झाला व म्हणाला "या पोराला मी जहाजावर घेतले नसते, तर हे उत्क्रांति–तत्त्वाचे अरिष्टच ओढवले नसते." परंतु त्यावेळी मात्र त्याला जहाजावर घ्यावे असे कप्तानाला वाटले! या नोकरीला पगार नव्हता. १८३१ च्या डिसेंबरच्या २७ तारखेला फिझरॉय् या कप्तानाच्या हाताखाली डार्विन् या सफरीला निघाला. जहाजाची सफर पाच वर्षे चालू होती. इकडच्या सर्व प्रदेशांचा अभ्यास हेच सफरीचे उद्दिष्ट होते. गालापात्रो बेटे, ताहिती, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, टास्मानिया, मालदीव

बेटे, मॉरिशस, सेंटहेलेन, असेन्शन, केपवर्ड आयलेंडस् आणि ओझोर्स इतक्या ठिकाणी आणि दक्षिण अमेरिकेच्या सर्व किनाऱ्यावर हे जहाज हिंडत राहिले होते. या पाच वर्षांत डार्विनने भूगर्भशास्त्र आणि प्राणिशास्त्र यांच्या व्यावहारिक ज्ञानाचा प्रचंड संग्रह केला. या दोनही प्रकारच्या संग्रहाची त्याने फार बारकाईने तुलना केली व त्यातील परस्परावलंबन पाहिले आणि मग त्यातूनच त्याचे उत्क्रान्तितत्त्व निघाले.

हे सारे जगत् म्हणजे डार्विनपुढे एक प्रश्नचिन्ह होते, एक गूढ व बिकट अशी समस्या होती, ती जणू गणितांतलाच एक प्रश्न होता, भूमितीतील एक सिद्धांत होता. तो सोडवावयास पाहिजे होता, त्यात पुष्कळच अज्ञात राशी होत्या, जग हे कौतुक करण्यासारखी कलाकृती नसून ते एक गणित आहे. एक कोडें आहे, असे डार्विनला वाटे. वाङमयाची त्याची आवड कधीच नष्ट झाली होती; पण त्याचे विज्ञानच त्याला वाङमयाप्रमाणे, कलेप्रमाणे, संगीताप्रमाणे झाले होते. मानवाविषयीचे त्याचे प्रेम कधीही नष्ट झाले नाही. विज्ञानाखालोखाल त्याला न्यायाविषयी उत्कट आस्था वाटे. एकदा त्याचे ‘ बीगल ’ जहाज ब्राझिल येथे थांबले. काही निग्रो गुलाम पळत होते. त्यामध्ये एक स्त्रीही होती. पाठलाग करणाऱ्यांचे हाती लागू नये म्हणून त्या म्हाताऱ्या निग्रो स्त्रीने कड्यावरून उडी घेतली. तिचे तुकडे तुकडे झाले ! डार्विन लिहितो, “ एखाद्या पोक्त व पावन रोमन स्त्रीने जर असे केले असते तर केवढे हे स्वातंत्र्यप्रेम ” असे म्हटले गेले असते; पण तेच निग्रो स्त्रीने केले म्हणून त्याचे “ पाशवी हट्टीपणा ” असे विकृत वर्णन करण्यात आले. ”

“ गुलामांच्या धन्याकडे करुणेने व आस्थेने पण गुलामाकडे मात्र निष्ठुरतेने पाहाणारे लोक स्वतः गुलामाच्या स्थितीत असल्याची कल्पना करून पाहतील तर गुलामांची स्थिती किती निराशाजनक असते हे त्यांना कळून येईल. आशेचा किरण नाही, उत्साह नाही, आनंद नाही, जीवनात कधी काही फरक पडण्याची वा स्थिती सुधारण्याची तिळमात्र शक्यता नाही ! किती केविल-वाणे जीवन ! आपली मुलेबाळे व पत्नी आपणापासून केव्हा विमुक्त केली जातील, याचा नेम नाही, क्षणोक्षणी ताटातूट होण्याची चिंता सतावीत आहे अशी परिस्थिती डोळ्यांसमोर आणा. ही ‘‘माझी पत्नी’’, ही माझी मुलेबाळे ! ” असे म्हणण्याचा निसर्गानेही न नाकारलेला गुलामांचा हक्क हिरावून घेऊन त्यांची लाडकी मुलेबाळे, त्यांची प्रियतम पत्नी, यांची गुराढोराप्रमाणे अधिकाधिक किंमत देणारांना विक्री करण्यात येते ! आणि तीहि कोणाकडून ?

तर शेजाऱ्यावरही आपल्याइतकेच प्रेम करण्याचा आव आणणाऱ्यांकडून! ईश्वरावर श्रद्धा ठेवणारे, त्याच्या इच्छेप्रमाणे पृथ्वीवर सर्वांनी वागावे असे उपदेशिणारेच या प्रकाराचे पुरस्कर्ते असावे, त्यांनी त्याचे समर्थन करावे व 'त्यात काय आहे!" असे म्हणून उडवाउडवी करावी हे केवढे आश्चर्य."

"बीगल" मधून सफर करीत असता मानवप्राण्यांची उत्पत्ति कसकशी होत गेली, हे शोधून काढण्यासाठी ज्याप्रमाणे त्याने बारकाईने निरीक्षण चालविले होते. त्याप्रमाणेच मानवाच्या दुःखाकडेही त्याची बारीक नजर होती. त्यांकडे तो कानाडोळा करीत नव्हता, करुणेने पाहात होता. सफरीहून परत आल्यावर त्याने आपली भाची एम्मा वेजवुड हिच्याशी विवाह केला. त्याला पुढे दहा मुले झाली. या मुलांचे खरे पूर्वज कोण याचाही शोध तो करीतच राहिला. त्याने खेड्यात एक घर खरेदी केले, त्याच्याभोवती विस्तृत बगीचा होता. सुदैवाने त्याला पोटासाठी काम करण्याची आवश्यकता नव्हती. त्याच्या वडिलांनी भरपूर मिळवून ठेवले होते. आपली मुले काहीही कष्ट न करता नीट जगू शकतील, आळसात राहू शकतील अगर आपल्या उज्ज्वल प्रतिभेची व अपूर्व बुद्धिमत्तेची करामत दाखवू शकतील अशी सोय त्यांनी करून ठेविली होती. लग्न करण्याच्या किंचित आधी त्याची प्रकृती बरीच खालावली होती, ती कधीच सुधारली नाही. तो जवळ जवळ चाळीस वर्षे आजाऱ्यासारखाच होता, तरीही त्याने एकट्याने दहा माणसांइतके काम केले! प्रथम त्याने "बीगल" वरून केलेल्या प्रवासाचे इतिवृत्त प्रसिद्ध केले. हे पुस्तक शास्त्रीय असूनही एखाद्या मनोरंजक कादंबरीप्रमाणे रसाळ वाटते. हरएक गोष्ट लिहिताना त्याच्या डोळ्यासमोर एकच ध्येय असे, लिहिलेले सर्वांना समजेल अशी भाषाशैली तो वापरी. भाषा सहज, सुंदर व स्वच्छ आणि विशद अर्थ सांगणारी व्हावी म्हणून डार्विनने खूप प्रयत्न केले. सुंदर लिहिणे त्याला प्रथम जड जात होते. पण अविरत प्रयत्नाने त्याने स्वतःची एक विशिष्ट भाषाशैली बनविली. मोकळी, सोपी व मनोहर भाषाशैली त्याने निर्मिली. त्याच्या जीवनाचे ब्रीदवाक्य "सतत प्रयत्नाने कार्य होते" हे होते. काव्याविषयी आपणास फार आवड नसल्याबद्दल त्याला फार वाईट वाटे, तरीही पण "बीगलवरील प्रवास" या त्याच्या पुस्तकात कवितांचे पुष्कळ उतारे आहेत. ब्राझिलचे पुढील वर्णन तो असे करतो– "येथील जमीन म्हणजे एक विस्तृत, अनिर्बंध, भव्य, भीषण व वैभवसंपन्न असे निसर्गाचे जणू उष्णमंदिरच आहे, पण निसर्गाच्या या घराचा कबजा मानवाने घेतला आहे. येथे मानवाने जागोजागी सुंदर घरे व लहान लहान बागा निर्मिल्या आहेत." ब्राझिलची भूमि पाहून तो म्हणतो

"आनंदाच्या व आश्चर्याच्या वादळात मीं बुडून गेलो," व मग लिहितो, नारिंगे, संत्री, नारळ, ताड, आंबे, केळी वगैरेंची बाह्यरूपे पृथक् पृथक् आहेत. पण या भिन्नभिन्न वृक्षवनस्पतींची सहस्रावधि सौंदर्य शेवटी एक भव्य अशी सौंदर्यकल्पना देतात. आणि वेगवेगळी सुंदर रूपे विलीन होऊन एकच सौंदर्य-कल्पना मनात राहते. पण ही विविधता गेली तरीही अस्पष्ट पण अत्यंत सुंदर अशा आकृतीची चित्रे हृदयफलकावर राहतात."

१८३५ च्या शेवटी पेरुदेशाचा किनारा सोडून "बीगल" साउथ अमेरिकेपासून पश्चिमेला सहाशे मैलावर असलेल्या गालापागो या द्वीपसमूहात ते जाऊन पोहोचले. तेथे जहाजाचा मुक्काम बरेच दिवस पडला. निरनिराळ्या लहान लहान बेटांवरील शेकडो प्रकारचे प्राणी त्याने जमा केले. अमेरिकेतून बरोबर आणलेल्या हजारो प्राण्यांची व यांची त्याने तुलना केली. तेव्हा त्याला दिसून आले की, अमेरिकेच्या मुख्य भूमीवरील प्राण्यात आणि बेटावरील प्राण्यात विलक्षण साम्य आहे. तेव्हा त्याने आपल्या मनाशी प्रश्न केला की, या द्वीपसमूहातील हे प्राणी आणि अमेरिकेच्या भूमीवरील ते प्राणी सृष्टिकर्त्याने एकाच वेळी निर्माण केले काय ? पण तसे बहुतेक झाले नसावे; कारण या दोघात जरी सादृश्य असले तरी ते त्यांच्या सामान्य स्वरूपापुरतेच. तपशीलात पाहू गेले म्हणजे स्वच्छ फरक दिसत होता. मग एकमेकाशी इतक्या सदृश, पण तंतोतंत मात्र नव्हेत, अशा निरनिराळ्या जाती करणाऱ्याने केल्या तरी कशाला ? बेटावरील पशुपक्षी हे जर भूमीवरील पशुपक्ष्यांशी अगदी तंतोतंत सारखे असले, किंवा ते एकमेकापासून सर्वथा भिन्न असले, तर बायबलात सांगितलेली प्राण्यांच्या पृथक् पृथक् निर्मितीची कथा खरी ठरेल. पण हे प्राणी तंतोतंत सारखेही नव्हते; व सर्वथा भिन्नही नव्हत, याचे करावयाचे काय ? बायबलातील एका एका प्राण्याच्या पृथक निर्मितीची कथा या ठिकाणी बिलकुल लागू पडेना. खरे उत्तर एकच होते की, प्राण्यात बदल होत जातो. हे पक्षी अमेरिकेच्या भूमीतून पूर्वी केव्हाना केव्हा तरी या बेटावर उडत आले असतील व येथे राहू लागल्यावर त्यांच्या स्वरुपात बारीक बारीक बदल झाले असतील. दुसरीही एक कल्पना त्याला शोभण्यासारखी वाटली. ही बेटेच पूर्वी केव्हातरी मुख्य भूमीशी सलग असली पाहिजेत व भूगर्भातील काही व्यापारामुळे पुढे केव्हातरी ती तुटून निघाली असली पाहिजेत. अर्थात मुळच्या भूमीवरील पशुपक्षी या बेटावर राहून गेलेले असले पाहिजेत व कालमानाने बेटाच्या पृथकपणामुळे त्यांच्या स्वरूपात फरक पडले असले पाहिजेत. शेवटी त्याने आपल्या मनाशी असा सिद्धांत केला की,

प्राण्यांच्या एका एका जातीची लक्षणे शाश्वत स्वरूपाची असतात हे खरे नाही. त्यांच्यात बदल होत जाणे हे खरे आहे, जो जो जास्त अवलोकन करावे, तो तो त्याला दिसू लागले की, हे बदलाचे टप्पे दाखवून देता येतात. भूमीच्या पोटात सापडलेल्या अवशेषांतही त्याला हेच तफावतीचे टप्पे दिसू लागले. एक नवा सिद्धांत आपल्या हाती लागत आहे या जाणिवेच्या आनंदाने डार्विनचे मन भरून गेले.

१८३६ च्या ऑक्टोबरच्या दोन तारखेस बीगल जहाज इंग्लंडात परत येऊन पोहोचले. पुढे काही महिने डार्विनने आपल्या टाचणांना व्यवस्थित रूप देण्यात घालविले, व हे टाचणांचे दांडगे पुस्तक त्याने प्रसिद्ध करून टाकले. ते प्रसिद्ध होताच डार्विनची गणना तेव्हाच मोठ्या शास्त्रज्ञात होऊ लागली. लग्न होऊन थोडे दिवस होतात न होतात तोच समुद्रावर जडलेले त्याचे ते अपचनाचे दुखणे जास्त झाले. लंडन शहर सोडून जावे असे त्याने अखेरीस ठरविले. केंट् परगण्यातील डाऊन नावाच्या एका खेडेगावी तो जाऊन राहिला. प्रकृती पुरती ढासळली आहे असे वाटावे. पुन्हा बरे वाटावे, बरे वाटल्यावर प्राणिशास्त्राचा अभ्यास पुढे चालू करावा, तो पुन्हा प्रकृती ढासळावी; असे होऊ लागले. या डाउन गावी वस्ती केल्यावर "दक्षिण अमेरिकेचे भूविज्ञान" आणि "ज्वाला-मुखी बेटे" ही दोन पुस्तके त्याने तयार केली. उत्तर ध्रुवाकडून हिवाळ्याचे दिवसात इंग्लंडकडे येणाऱ्या हंस जातीच्या पक्षांवरही त्याने एक प्रबंध लिहिला. पण हा सगळा उद्योग करीत असताना त्याच्या मनात उत्क्रांति-तत्वाची रचना हळूहळू होत चालली.

ग्रीकांना व रोमनांना उत्क्रांतीचे तत्त्व अज्ञात नव्हते, पण खिश्चनधर्म येताच उत्क्रांतीचा विसर पडून बायबलमधील सृष्टयुत्पत्तीची कल्पित कथा खरी मानली जाऊ लागली. गॅलिलीच्या कल्पनाप्रिय कोळ्यांच्या संगतीत मानवजात जणू शास्त्रीय दृष्टि विसरून गेली, गमावून बसली! ती शास्त्रीय दृष्टी परत येण्यास व तिला गती मिळण्यास अठराशे वर्षे लागली; जग-न्निर्मिती बाबतच्या ज्यूडोखिश्चन कल्पनेने पाश्चिमात्य जगावर इतका परिणाम केला होता की, डार्विनने आपली उत्क्रांतीची कल्पना— उत्क्रांतीची उपपत्ती मांडली, तेव्हा तो सृष्टिनिर्मात्या ईश्वराचा खून करीत असल्यासारखा भासला. लोकांना तो खुनी वाटला. मनुष्याच्या अमर आत्म्याच्या मनोहर कथेचा डार्विन जणू वध करीत होता! ते मधुर काव्य तो मातीस मिळवीत होता! प्रत्येकजण आपला तिरस्कार करील हे डार्विनने अपेक्षिलेच होते. हार्वर्ड येथील स्नेही प्रोफेसर ॲसाग्रे यांना लिहिलेल्या पत्रात डार्विन म्हणतो,

"मला तुम्हास प्रामाणिकपणे सांगावेसे वाटते की, रूढ कल्पनेहून वेगळ्या निर्णयाप्रत मी आलो आहे. निरनिराळे प्राणी अलग अलग निर्माण करण्यात आलेले नसून ते सारे परस्परावलंबी आहेत... हे वाचून तुम्ही माझा तिरस्कार कराल हे तर खरेच, पण मी तुमच्यापासून माझा निर्णय लपवीन तर मी प्रामाणिक कसा राहू शकेन ?" त्याच्या प्रतिभेने व बुद्धीने लावलेला शोध सर्व जगाला ज्ञात करून देई तो त्याचा प्रामाणिकपणा त्याला स्वस्थ बसू देईना.

जगाची म्हणजे वस्तुजाताची पाहणी अजून झालेलीच नव्हती. ती डार्विनने केली असेच जाणते लोक म्हणतात. आपण जे अनुमान काढू इच्छितो, त्याला बाधक दिसणारा पुरावा मुद्दाम नोंदून ठेवण्याची कसोशी डार्विन करीत असे. मात्र रूपांतराचा ( variation ) पुरावा जो जो साचत चालला, तो तो उत्क्रांतितत्त्वाचे खरेपण डार्विनच्या बुद्धीला जास्तच पटू लागले. जहाजावर असताना रूपांतराचे शेंकडो नमुने त्याने पाहिले होते. प्राण्यांची निरनिराळी अवलाद तयार करणारे, फळांच्या आणि झाडांच्या निरनिराळ्या जाती कलमादिकांनी तयार करणारे, यांच्याशी त्याने पुष्कळ चर्चा केली. दरवेळी त्याला असेच दिसून आले की, मूळ स्वरूपापासून काहीसे दूर सरकणे, म्हणजेच बारकी बारकी रूपांतरे करून घेणे हा पशुपक्षांचा आणि झाडाझुडपांचा प्रकृतिधर्मच आहे.

या बाबतीत त्याने लामार्कची तत्त्वश्रेणी तपासून पाहिली परंतु त्याला ती पसंत पडेना. हळहळू हा न्याय त्याला पटू लागला की, परिस्थितीचा परिणाम पशुपक्ष्यांच्या पिंडावर होत राहतो हे खरे नसून पशुपक्ष्यांचे पिंड नव्या परिस्थिति-विशेषांशी जमवून घेतात; म्हणजेच त्या विशेषांशी जमणारे अवश्य ते फरक स्वतःच्या ठिकाणी करून घेतात; हा न्याय खरा आहे.

याच्या पुढचा प्रश्न असा होता की, मूळ स्वरूपापासून दूर सरकणे, म्हणजेच बारीक बारीक रूपांतरे करून घेणे, हे तरी का व्हावे ? परिस्थितिविशेषांशी जमवून घ्यावे म्हणून पशुपक्ष्यांचे पिंड हा मार्ग पत्करीत असतील. पण अशा तऱ्हेने जमते घेण्याचे काम तरी त्यांनी का करावे ? न केले तर काय होईल ? प्रश्न फारच महत्वाचा होता. डार्विनला त्याचे उत्तर सुचेना; चिंतनात मग्न असताना काही तरी निराळे वाचावयास काढावे म्हणजे मनोरंजन तरी होईल म्हणून काही पुस्तकांना त्याने चाळले, तो माल्थस याचा Essay on Population लोकसंख्येवरील प्रबंध हा ग्रंथ त्याच्या हातास लागला. तो वाचता वाचता 'Struggle for Existence' म्हणजे

जिवंत राहण्यासाठी झगडत राहणे, म्हणजेच जमवून घेणे अथवा रूपांतरे करून घेणे, ही शब्दसंहती त्याला भेटली. त्याच्या डोक्यात एकदम प्रकाश पडला. निराळ्या परिस्थिति-विशेषात पशुपक्ष्यांचे पिंड आपल्या ठिकाणी रूपांतरे कशासाठी करवून घेतात हा प्रश्न त्याला पडला होता. माल्थस्‌चे प्रतिपादन वाचून त्याला असे उत्तर सुचले की, जिवंत राहणे हाच त्यांचा मुख्य हेतू असल्यामुळे ते आपल्या ठिकाणी अशी रूपांतरे करून घेतात. अर्थातच याच सूत्राने पुढे जाता जाता हाही न्याय सिद्ध होतो की, जे कोणी या पद्धतीने जगण्याची तरतूद करतात तेच जगून राहतात. म्हणजे जे जगण्यास पात्र आहेत तेच जगतात व बाकीचे मरून जातात.

Natural Selection याचा अर्थ Nature ने म्हणजे निसर्गाने केलेली जी निवड किंवा पसंती. ती Natural Selection म्हणजे निसर्गाची पसंती होय. निसर्ग कोणाला निवडतो ? तर जे पशुपक्षी नव्या नव्या परिस्थितीत जगण्यासाठी आपल्या पिंडात अवश्य ते फरक करून घेतात त्यांनाच तो निवडतो. निसर्ग त्यानाच जवळ करतो. केलेल्या टाचणावरून डार्विनच्या ध्यानात आले की, ज्यांनी रूपांतरे करण्याचे नाकारले त्यांना सृष्टीने जगण्यासाठी निवडले नाही. हे फरक बारीक बारीक असतात, तेवढे वजा केले म्हणजे बाकीच्या बाबतीत त्या जातीत व इतर पुष्कळच सारखेपणा असतो. अंतरे पाडीत हळूहळू पिढ्या वाढत जाव्या व नवीन जाती उत्पन्न व्हाव्या याचेच नाव " उत्क्रान्ती " असे आहे.

इ. स. १८४२ मध्ये डार्विनने निसर्ग–पसंतीचे हे तत्त्व पहिल्याने लिहून काढले. हा सर्व काल व पुढील पंधरा वर्षे ही मीमांसा पारखून व पडताळून पाहण्यात व तिच्यातील दोष काढून टाकण्यात खर्चून जे नवे निर्णय निघाले त्यांचे तो पुन्हा पुन्हा पर्यालोचन करीत होता. डार्विन स्वतःच स्वतःचा निर्भीड टीकाकार असल्यामुळे विरोधकांचे आक्षेप आधीच कल्पून त्यांना बिनतोड उत्तरे देण्यास तयार होता. दरम्यान त्याची प्रकृती फारच बिघडू लागली. आपण मरतो असे त्यास वाटू लागले. म्हणून त्याने आपले हे संशोधन एका पाकिटात घालून बंद केले व बायकोच्या हवाली करून तो म्हणाला, "मी मेल्यावर हे प्रसिद्ध कर." पुस्तकाचे संपादन कोणी करायचे हेही त्याने सांगून ठेवले. प्रकाशनाच्या खर्चाची व्यवस्था त्याने करून ठेविली. १८४४ तच जर तो मेला असता तर Origin of Species हा त्याचा ग्रंथ कधीच प्रसिद्ध झाला नसता. पुढे ८–१० वर्षे त्याने आणखी परिश्रम केले. पशुपक्ष्यांवर प्रयोग करून पाहिले, शेकडो तुलना केल्या. शेवटी १८५४ मधे त्याने आपल्या मित्राला

लिहिले की, "मुख्य ग्रंथाला हात घालण्याच्या आधी जे बारीकसारीक शोध करावयास हवे होते ते आता पूर्ण झाले आहेत, म्हणून मी माझ्या मुख्य कामाला लागतो." त्याने आपल्या तत्त्वज्ञानाचा सर्व आराखडा लिहून काढला. पण १८५८ च्या जून महिन्यात एक विलक्षण प्रकार घडून आला व त्यामुळे डार्विन अगदी भांबावून गेला. अकस्मात एके दिवशी त्याला दिसून आले की, दुसऱ्या एका शास्त्रज्ञाने नकळत आपली सारी विद्या चोरून घेतली. जूनच्या १८ तारखेस त्याचा मित्र आल्फरेड रसेल वॅलेस याने उत्क्रांतीवरचा एक स्वतंत्र लेख डार्विनकडे पाठविला व "मी मांडलेल्या उपपत्तीवरील तुमचे प्रामाणिक मत कळवा, त्यावर मनमोकळी टीका करा" असे त्याला कळविले. वॅलेस अमेरिकेत होता. डार्विन वीस वर्षे प्राण्यांच्या उत्पत्तीचे संशोधन करीत होता हे त्याला माहीत नव्हते; त्यामुळे 'उत्क्रांतीच्या उपपत्तीचा संशोधक' म्हणून जगाला आपली ओळख करून देण्याबद्दल त्याने डार्विनला विनंती केली. अशा परिस्थितीत डार्विनने काय करावे? त्या विषयावरील आपल्या संशोधनाच्या व लिखाणाच्या अगदी बरहुकूम वॅलेसचे संशोधन, तसेच लिखाणही होते. हे पाहून सुप्रसिद्ध भूगर्भशास्त्रज्ञ डॉ. लायल यास डार्विनने लिहिले, "असा योगायोग मी कधीच पाहिला नाही. किती आश्चर्यकारक योगायोग! १८४२ साली मी लिहिलेले हस्तलिखित वॅलेसजवळ असते तर याहून अधिक संक्षिप्त सारांश त्याला काढता येणे अशक्य होते." एकदा तर सारे श्रेय वॅलेसलाच देऊन टाकावे असे त्याला वाटले. "क्षुद्रवृत्तीने मी वागलो अशी शंकाही कोणास येऊ नये म्हणून माझी सर्व हस्तलिखिते जाळून टाकावी असे मला वाटते" असे त्याने लॉयलला लिहिले. त्यावर लॉयलने उत्तर दिले, "तुम्ही आपले सर्व विचार ताबडतोब प्रसिद्ध करा. स्वतःच्या बाबतीत अन्याय नका करून घेऊ, आपल्या आधीं वीस वर्षे डार्विनने ही उपपत्ती अजमावली होती हे ऐकून वॅलेसला वाईट न वाटता आनंदच होईल." शेवटी लिन्यिन् सोसायटी समोर आपले व वॅलेसचे संयुक्त संशोधन म्हणून ही उपपत्ती मांडण्याचे त्याने ठरविले. तथापि उदारपणात आपणही मागे नाही, हे 'ज्या उपपत्तीचे संपूर्ण श्रेय वस्तुतः डार्विनचे आहे तिच्या श्रेयात मलाही भाग मिळावा हे माझे केवढे सुदैव!' असे जाहीर करून वॅलेसने दाखविले. अशा रीतीने ही सुप्रसिद्ध चर्चा थांबली. प्रत्येकाने आपल्या कीर्तीचा प्रश्न बाजूस सारून दुसऱ्याचे नांव मोठे व्हावे म्हणून मोठे मन दाखविले.

उत्क्रांतीची थोडक्यात उपपत्ती अशी आहे. 'जीवनाची अमर्याद वाढ होत असल्यामुळे जीवनार्थ कलह सुरू असतो व त्यात अधिक क्षम व समर्थ

अनुक्रमणिका

असणारे टिकतात बाकीच्या प्राण्यांच्या जाती नष्ट होतात; एकीतून दुसरी उत्पन्न होते.' या उपपत्तीप्रमाणे आपण जे अगदी खालचे प्राणी म्हणून समजतो त्यांच्यापासून मानव फार दूर नाही. त्यांचीच पुढची पायरी म्हणजेच मानवप्राणी. ही पुढची पायरी डार्विनने "मानवाचा अवतार" या पुस्तकात प्रतिपादिली आहे. मानवप्राणी माकडापासून उत्क्रांत झाला या उपपत्तीचे श्रेय वा अश्रेय सामान्यतः डार्विनला देण्यात येते, पण खरोखर पाहिल्यास डार्विनने असे काही एक म्हटलेले नाही. त्याने जास्तीत जास्त इतकेच सांगितले की, मानव व वानर हे एकाच पूर्वजापासून केव्हातरी जन्मले. हा प्राचीन प्रागैतिहासिक पूर्वज आज अस्तित्वात नाही. म्हणजेच वानर हा आपला आजोबा नसून भाऊ आहे. डार्विनच्या मते प्राण्यांतील परमोच्च विकास मानवात झाला आहे. सर्वांत जास्त विकसित प्राणी म्हणजे मानव. 'समर्थाचे अस्तित्व' या कायद्याप्रमाणे त्याने इतर प्राण्यांवर प्रभुत्व मिळविले आहे. समर्थ वा क्षम या शब्दांचा डार्विनचा अभिप्रेत अर्थ "अति बलाढ्य किंवा अति निर्दय" असा नाही; खालच्या प्राण्यात कोणी टिकावयाचे व कोणी नष्ट व्हावयाचे हे बलाबलानेच ( शारीरिक झटापटीनेच ) ठरते. पण मानवांच्या बाबतीत वैयक्तिक झगडा नष्ट होऊन सर्व मानवप्राण्यांचे सामाजिक सहकार्यच संरक्षणाचे साधन बनते.

स्वार्थी आक्रमणशीलता जाऊन तिच्या जागी हळूहळू अन्योन्य साहाय्य व सहकार्य यांचे तत्त्व रुढ होते. मानवी जीवनाला अतःपर जंगलाचा कायदा लावणे बरे नाही. व्यक्तीचे जीवन नीट राहावयाला पाहिजे असेल तर सर्व मानवजातीने नीट जगावे यासाठीच खटपट केली पाहिजे. सर्व मानवाच्या जीवनार्थ झटण्यातच व्यक्तिच्याहि संरक्षणाचा परमोत्तम मार्ग आहे, म्हणून मनुष्य हा सामाजिक प्राणी आहे. तो ईश्वराची प्रतिकृती म्हणून जन्मलेला नाही. तो पडलेला – अधोगत – देवदूत नसून उत्क्रांतीच्या सोपानाने उन्नत होत असलेला रानटी पशु आहे, रानटी मानव आहे, त्याचा मार्ग उत्तरोत्तर वरचा आहे. या जगात जे जे सजीव आहे, जे जे जीवनार्थ धडपडत आहे त्यांच्याशी मानवाचा संबंध आहे. त्यांच्यामध्ये पशुत्वाचे व लाखों, करोडो प्राण्यांचे अंश आहेत. जीवन उत्क्रांत होत असून मनुष्याला अद्यापि एक प्राणी म्हणूनच म्हणावे लागेल; पण प्रेमाची अपरंपार – अनंत – शक्यता असणारा हा प्राणी आहे.

खुद्द डार्विनचेच जीवन त्याच्या उपपत्तीचा सबळ व उत्कृष्ट पुरावा आहे. त्याची प्रेमशक्ति सारखी वाढत होती, त्याच्या उपपत्तीसाठी त्याच्या-

वर टीका, निंदा, यांची लाखोली वाहण्यात आली तरी त्याने निंदकांविरुद्ध एकही कटु शब्द उच्चारला नाही. आपल्या सहकाऱ्यांशी त्यांचा एक नम्र साहाय्यक म्हणून तो वागे; त्याने त्यांच्यावर कधीही वरचष्मा गाजविला नाही. ज्यांची नावेहि कोणास माहित नसत अशा प्रयोगशाळेतल्या कामगाराविषयी व माहिती गोळा करून देणाऱ्याविषयी तो फार कृतज्ञता दाखवी. ते अमोल मदत देत. डार्विन त्यांना विज्ञानशास्त्रांतील हमाल म्हणे. प्राणी कितीहि क्षुद्र असला तरी त्याचा तिरस्कार करीत नसे. प्राणिमात्र त्याला पवित्र वाटे. बुद्धाला साऱ्या विश्वाविषयी अपार प्रेम वाटे, तसाच थोडासा डार्विनचा प्रकार होता. तो बुद्धाच्याच जातीचा होता, त्याला सारे जीवन पवित्र वाटे. सजीव प्राण्याविषयी बोलावे तसे तो झाडेमाडे, तृणवेली, वगैरे विषयीहि बोले. त्याने लावलेल्या एखाद्या झाडाचे अगर गवताचे रोंवलेले अगर खोवलेले पान वर आले की त्याची ती हुषारी पाहून तो म्हणे, "अरे लबाडा, वर आलास? मी तुला अडकवून, डांबून ठेवले तरी वर डोके काढलेच?" अशी त्याची प्रेमाने खरडपट्टी काढून तो त्यांच्यावर रागवायचा. कांही बीजांकुरांवर प्रयोग करता करता तो चिडून म्हणे, ही भिकारडी चिमुरडी मला पाहिजे त्याच्या नेमके विरुद्ध करतात, चावट, ?" प्रत्येक रोपटे त्याला जणू व्यक्तित्वसंपन्न पवित्र व्यक्तिच वाटे. फुलांचे सौंदर्य पाहून त्याची जणू समाधी लागे! फुलांपासून मिळणाऱ्या निर्दोष व निरुपम आनंदाबद्दल तो सदैव कृतज्ञता प्रगट करी. तो फुलांच्या पाकळ्यांना अगदी हळुवारपणे स्पर्श करी, त्यावेळी त्याच्या डोळ्यात एखाद्या संताचे अपरंपार प्रेम वा एखाद्या बालकाचे निष्कपटी कुतूहल दिसे. त्याचा ख्रिश्चन धर्मावर विश्वास नव्हता, तरीही त्याचा स्वभाव मात्र ख्रिस्ता-सारखा होता. तो म्हणे, "ईश्वराने कोणाला एखादा ग्रंथ दिला यावर माझा तरी विश्वास बसत नाही." तो अज्ञेयवादी होता. अपरंपार दुःखाने भरलेल्या या जगाची रचना एखादा ज्ञानी ईश्वर करणे शक्य आहे का असे तो विचारी. तो म्हणतो, "या जगाच्या पाठीमागे काही कल्याणावह योजना तर नाहीच नाही, पण मुळी योजनाच असेलसे वाटत नाही." पण तो केवळ नास्तिक नव्हता. तो जपून जाणारा होता. तो या निर्णयाप्रत आला की, 'हा सारा विषय मानवी बुद्धीच्या अतीत आहे. मनुष्याने आपले कर्तव्य करावे म्हणजे झाले." त्याचे स्वतःचे कर्तव्य आमरण सारखे श्रमत राहणे हे होते, आपल्या बांधवांना ज्ञानाचा प्रकाश देण्यासाठी अविरत झटणे हे त्याचे कर्तव्य होते. पण श्रम करताना त्याला वरचेवर दोन

अडथळे येत. तो सुखी व संपन्न असल्यामुळे त्याला फार श्रमण्याची संवय नव्हती. प्रकृती बरी नसल्यामुळे काबाडकष्ट करणे त्याला अशक्यच होई. पण आपल्या इच्छाशक्तीच्या जोरावर त्याने या दोन्ही अडचणींवर जय मिळविला. सुखासीनतेची संवय त्याने सोडून दिली. पत्नीच्या प्रेमळ सेवापरायणतेमुळे शारीरिक व्यथेची व आजाराची अडचण दूर झाली. डार्विनची पत्नी, अत्यंत दयाळू व फार थोर स्त्री होती. डार्विनने तिला "अत्युत्तम व अतिप्रेमळ" असे संबोधून अमर केले आहे. डार्विन नेहमी आजारीच असावयाचा; त्याच्या पत्नीने त्याच्या या प्रकृतीला अनुरूप असे शांत जीवन ठेविले; कधी आदळआपट नाही, कधी रागवारागवी नाही. ती त्याला उत्साह देई, पण टोचीत नसे. त्याच्या प्रयोगाशी ती परिचित राही; प्रुफे तपासण्यांच्या कामी त्याला मदत करी. त्याला शारीरिक वेदना होत तेव्हा त्याची इतक्या प्रेमळपणे व कनवाळूपणे शुश्रूषा करी की, तो म्हणे, 'तुझ्याकडून शुश्रूषा करून घेण्यासाठी आजारी पडणेही बरे.' एम्माचे डार्विनवर जितके प्रेम होते तितकेच डार्विनचे एम्मावरही होते. दोघांचे हे अन्योन्य प्रेम त्यांच्या मुलांच्या स्वभावात पूर्णपणे उतरले होते. पूर्णपणे विकसित अशा जीवांचे हे कुटुंब होते. त्यांचे संवर्धन फारच उत्कृष्टपणे झाले होते. ती मुले आनंद, सौम्यता व अन्योन्य आदर अशा वातावरणात वाढली होती. आदरभाव म्हणजे काय ? दुसऱ्याच्या भावनांची सहानुभूतिपूर्वक जाणीव. सानुकंप विचार म्हणजे सद्भाव, आदरभाव, डार्विनच्या चारित्र्याची ही मुख्य किल्ली आहे. वयाच्या ७३ व्या वर्षी त्याने लंडनला शेवटची भेट दिली. आपल्या एका मित्राच्या घरात शिरत असता त्याला घेरी येऊ लागलीसे पाहून त्याचा मित्र बाहेर गेलेला होता तरी आचाऱ्याने त्याला 'आत या ना' असे म्हटले; पण बटलरला कशाला उगीच त्रास, या भावनेने डार्विन आत न जाता धडपडत बाहेर गेला व गाडी पाहू लागला. पुढे तीन महिन्यानी म्हणजे १८८२ सालच्या एप्रिल महिन्याच्या १६ तारखेस तो मरण पावला. त्याला मरणाची यत्किंचितही क्षिति वाटली नाही. तो मरणास तयारच होता. त्याच्या अधार्मिक मतांसाठी त्याच्या शत्रूंनी त्याला नरकाचा धनी ठरविले, पण एका धर्मशील स्त्रीच्या मते, "तो इतका चांगला होता की, तो खात्रीने स्वर्गासच गेला असला पाहिजे, डार्विनचे ईश्वराशिवाय चालेल, पण त्या सर्वशक्तिमान ईश्वराचे डार्विनशिवाय कसे चालणार ?

◆ ◆ ◆

श्री. बा. रं. सुंठणकर

टॉयन्बीकृत-

# पश्चिमी राष्ट्रांच्या आशियातील साम्राज्य-विस्ताराची मीमांसा

( पूर्वार्ध )

[ प्रसिद्ध इतिहासलेखक प्रा. अर्नोल्ड टॉयन्बी यानी एका लेखात पश्चिमी राष्ट्रांच्या आशिया खंडातील साम्राज्य-विस्ताराची मीमांसा केली आहे. ती सारांशाने शक्य तो त्यांच्याच शब्दात देण्याचा प्रयत्न केला आहे. प्रा. टॉयन्बी यानी हा लेख अमेरिकेने उत्तर व्हिएटनामवर हल्ला सुरू केल्यानंतर थोड्याच दिवसानी लिहिला होता. त्यानंतर गेल्या १० वर्षात आंतरराष्ट्रीय क्षेत्रात खूपच बदल झाले आहेत. आधुनिक काळात आशिया-खंडावर जी आक्रमणे झाली ती सागरावरून झाली. टॉयन्बी म्हणतात त्याप्रमाणे जुन्या साम्राज्यशाह्या कालबाह्य झाल्या असल्या तरी आशियाई राष्ट्रांच्या बाबतीत सागरावरचा धोका अद्याप कमी झाला नाही. ब्रिटनने आशियाई सागरातून माघार घेण्याचे ठरविल्यामुळे जी पोकळी निर्माण होत आहे ती भरून काढण्याकरिता अमेरिका आणि रशिया पुढे सरसावत आहेत. अमेरिकेने आरमारी तळही प्रस्थापित केला आहे. चीनही स्वस्थ बसू इच्छित नाही. म्हणून भारत आणि श्रीलंका घोषित करीत आहेत की, हिंदी महासागर हा शांततेचा महासागर असावा, तेथे परकीयांचा हस्तक्षेप नसावा. टॉयन्बी यांच्या लेखात कम्युनिझमच्या लाल साम्राज्यवादाचा उल्लेख आला नाही. पण त्या धोक्यापासून आशिया मुक्त नाही. जुनी साम्राज्यशाही कालबाह्य झाली, पण त्याची जागा महासत्तांच्या स्पर्धेने घेतली आहे. महासत्तामधील थंडे युद्ध संपुष्टात आले आहे. पण अविकसित राष्ट्रांना त्यांचा धोका अधिकच वाढला आहे. जोपर्यन्त सागरी सामर्थ्याच्या बाबतीत आशियाई राष्ट्रे समर्थ होत नाहीत तोपर्यंत सागरावरील धोक्यापासून ती मुक्त होणार नाहीत हेच टॉयन्बी यांचा हा लेख सूचित करीत आहे. ]

अनुक्रमणिका

अर्वाचीन काळात पाश्चात्य राष्ट्रानी आशिया खंडामध्ये जो साम्राज्य-विस्तार केला त्याला वसाहतवाद म्हणण्याची रूढी पडली आहे. पण त्या-ऐवजी साम्राज्यवाद हे नाव अधिक उचित आहे. अमेरिकेच्या दोन्ही खंडात, ऑस्ट्रेलियात, न्यूझीलंडमध्ये पाश्चात्य लोक स्थायिक झाले आणि तेथे त्यानी वसाहती केल्या. आशियामध्ये पाश्चात्य राष्ट्रानी जे आक्रमण केले ते तेथे स्थायिक होण्यासाठी नव्हे. ते तेथे गेले ते व्यापाराकरिता, मिशनरी म्हणून कार्य करण्या-करिता, आशियातील प्रदेश जिंकून घेऊन त्यावर राज्य करण्याकरिता. अमेरिकेत जे युरोपीय गेले त्यानी तेथील मूळच्या लोकांना जवळ जवळ हुसकून लावून त्यांचा सर्व प्रदेश बळकावला व कायमच्या वसाहती केल्या. पेरू आणि मेक्सिको या दोन देशात मात्र स्पॅनिश वसाहतकारांना प्राचीन कृषिप्रधान संस्कृति आढळून आली. हे दोनच प्रदेश असे आहेत की, जेथे तेथील सध्यांच्या प्रजाजनामध्ये स्पॅनिश रक्ताचा अंश अगदी थोडा आहे. त्यांची तुलना आशि-यातील पाश्चात्य साम्राज्याबरोबर करता येईल. बाकीच्या प्रदेशात म्हणजे अर्जेन्टिना, युराग्वे, युनायटेड स्टेटस्, कॅनडा, आस्ट्रेलिया या देशाच्या सध्याच्या लोकसंख्येत मूळ वसाहतकारांचेच वंशज फार मोठ्या प्रमाणात आहेत.

आशियात साम्राज्यविस्तार करणारी राष्ट्रे म्हणजे पोर्तुगाल, स्पेन, हॉलंड, फ्रान्स, ब्रिटन, आणि अगदी शेवटी अमेरिका ही होत. या सहाही राष्ट्रांच्या ताब्यात अटलांटिक महासागरावरचे काही ना काही किनारा-प्रदेश होते. यापैकी पहिल्या पांच राष्ट्रांचे किनारे पश्चिम युरोपात आहेत आणि सहाव्याचा किनारा उत्तर अमेरिकेत आहे. एका सागरात प्रवेश मिळाला म्हणजे जगाच्या कोणत्याही सागरात प्रवेश करता येतो. नौकानयनाच्या विद्येत ज्याचा हातखंडा असतो तो एका बंदरातून दुसऱ्या कोणत्याही सागरावरील बंदरापर्यंत सफर करू शकतो. १६ व्या शतकात पोर्तुगीजांची जहाजे केप ऑफ गुडहोपला वळसा घालून मलाक्काच्या सामुद्रधुनीतून मार्ग काढून कँटनला जाऊन पोहोचली होती. त्याचप्रमाणे १९ व्या शतकात न्यू इंग्लंडहून निघालेली जहाजे त्याच कँटनकडे केपहॉर्नला वळसा घालून पोचत होती.

अर्वाचीन युगात सागरावर प्रभुत्व म्हणजे जगावर वर्चस्व मिळविण्याची गुरुकिल्लीच होय. म्हणून साम्राज्यविस्तारात सागरी किनाऱ्याला महत्त्व असते. हे लक्षात घेतले म्हणजे इटालियन आणि जर्मन लोक साम्राज्य विस्ता-राच्या साहसकार्यात का मागे पडले आणि त्यातील त्यांचा भाग गौण का हे समजून येते. मध्ययुगात त्यांची सत्ता भूमध्य आणि बाल्टिक समुद्रावर

अनुक्रमणिका

चालत होती; पण आधुनिक युगात ते मागे पडले. पोल आणि मग्यार या लोकांना महासागरी किनारापट्टी नसल्यामुळे साम्राज्यविस्तारात ते प्रत्यक्ष भाग घेऊ शकत नव्हते. मग प्रश्न असा उत्पन्न होतो की, आशियातील लोकांजवळ स्वतःचे विस्तीर्ण किनारे असूनही पाश्चात्य लोकांपुढे त्यांचा टिकाव का लागला नाही ?

खिस्ती शकाच्या आरंभी हिंदूंनी सागर ओलांडून इंडोनेशिया, काम्बोडिया, व्हिएतनाम आणि आग्नेय आशियातील देशात धर्मप्रसार केला होता. अरबी आणि इराणी खलाशी मध्ययुगाच्या आरंभी चीनच्या दक्षिण किनाऱ्यावर पोहोचले होते. मुसलमानांच्या नाविक संचाराची चिरस्थायी स्मारके त्यांच्या धर्माच्या रूपाने इंडोनेशिया, मलाया, फिलिपाईन्स येथे आजही पहावयास मिळतात. १५ व्या शतकात चीनी नाविक आफ्रिकेच्या किनाऱ्यापर्यंत धडकले होते. पोर्तुगीजांच्या भावी संचाराची जणू ही एकप्रकारे पूर्वसूचना होती. असे होते तर मग चीनी नाविक केप ऑफ गुडहोपला वळसा घालून स्पेनच्या किनाऱ्यासमोर दत्त म्हणून उभे राहून हेन्री राजाला धक्का का देऊ शकले नाहीत ? आणि जपानी लोकांनी १६३० नंतर अलिप्ततेत तरी दडी का मारावी ?

१६४२ साली पोर्तुगीज अगदी प्रथम जपानच्या किनाऱ्यावर उतरले होते. त्यावेळी जपान्यांनी त्यांच्या तंत्रविद्येचे, धर्माचे आणि विचारांचे उत्सुकतेने स्वागत केले. जपानी लोकांना आपल्या संख्याबलावर पोर्तुगीज किंवा डच लोकांप्रमाणे आग्नेय आशियात हातपाय पसरता येणे अगदी शक्य होते. पुढे १९ व्या शतकात जपान्यानी पाश्चात्य सुधारणांचा स्वीकार केला त्यावेळी फार उशीर झाला होता आणि साम्राज्यविस्तार करण्याची वेळ निघून गेली होती. चीनवरील आक्रमण, पर्ल हार्बरवर अचानक हल्ला, " आशियाई सहवैभव क्षेत्र " ही सर्व जपानच्या सामर्थ्याची प्रदर्शने होती. पण पाश्चात्यांच्या धर्तीचे हे जपानी उपक्रम कालविसंगत ठरले, ते अल्पजीवि ठरले. त्यांचे पर्यवसान अणुबाँबच्या स्फोटात आणि नागासाकी आणि हिरोशिमा उध्वस्त होण्यात झाले. त्यामुळे अमेरिकेला नव्या साम्राज्यविस्ताराचा पाया घालण्याची चेतावणी मिळाली. वास्तविक तत्पूर्वी फिलिपाईनला स्वातंत्र्य देऊन अमेरिकेने साम्राज्यविसर्जनाच्या बाबतीत इतर साम्राज्यराष्ट्राप्रमाणे पुढाकार घेतला होता.

ऑटोमन तुर्कांनी खिस्ती जगाला नामोहरम केल्यानंतर १५१७ मध्ये त्यांनी इजिप्तही पादाक्रांत केला होता. मग पोर्तुगीजाबरोबरच्या स्पर्धेत ते अरबी समुद्रावर हुकुमत का गाजवू शकले नाहीत? लगतचे अंतर्गत सागरी मार्ग त्यांच्या ताब्यात होते. जेथे पोर्तुगीजाना केपला वळसा घालून पुढे जाणे भाग पडत असे तेथे फक्त सुएझची सामुद्रधुनी ओलांडून तुर्की लोक पलीकडे गेले असते तरी त्यांचे काम झाले असते. शिवाय पश्चिम भारतात गुजराथचा मुसलमान बादशहा तुर्कांचा मित्र होता. पण घडले ते असे की पोर्तुगीजानी १५३८ पर्यंत हिंदी महासागरातून तुर्कांना हुसकून लावले होते.

## साम्राज्यविस्ताराच्या प्रेरणा

साम्राज्यशाही सत्तेच्या स्पर्धेमध्ये पाश्चात्य यशस्वी झाले त्याचे एक कारण म्हणजे त्यांना त्यावेळी भासत असलेल्या आत्यंतिक आर्थिक गरजेचे दडपण होय. या दडपणाच्या रेटयामुळेच नेटाने प्रयत्न करणे त्यांना भाग पडत होते. या उलट चीनची स्थिती होती. १७९३ मध्ये चीनचा बादशहा चिएनलुंग याने इंग्लंडच्या तिसऱ्या जॉर्ज राजाने आपल्या वकीलामार्फत पाठविलेले नजराणे परत केले. त्याचे कारण त्याने असे सांगितले की, आपल्या राज्यात साऱ्या वस्तु मिळत असल्यामुळे दुसऱ्या एखाद्या छोटया राजाच्या नजराण्यांची आपल्याला गरज नाही. चीनी सत्ताधाऱ्यांच्या दृष्टीने इंग्लंडचा राजा म्हणजे चीनच्या जगत् साम्राज्यातील एक दुय्यम दर्जाचा मांडलिक होता. चीनला साम्राज्यविस्ताराची गरज वाटत नव्हती. पण १५ व्या शतकात पोर्तुगालला तशी गरज तीव्रतेने भासत होती. आयबेरियन द्वीपकल्पात पोर्तुगाल एका बाजूने कॅस्ताइलने वेढले गेले होते. त्यामुळे इतर युरोपीय जगापासून ते वेगळे पडत होते. दुसऱ्या बाजूने पोर्तुगाल, कॅस्ताइल आणि इतर पश्चिमी देशांना इस्लामी जगाचा गराडा पडला होता. अशा कुचंबणेत पोर्तुगाल सापडला होता. युरोपीय खिस्ती जग त्या काळी ईशान्य दिशेकडे रशियाच्या खिस्ती प्रदेशाच्या बाजूनेच तेवढे विस्तार पावू शकत होते. पण इस्लामी जगाने रशियालाहीपण रोखून धरले होते. कारण क्रायमियापासून कझानपर्यंत तार्तरांचे राज्य पसरले होते आणि खिस्ती प्रदेशाकडून ते खंडणी वसूल करीत होते.

यात आणखी एका गोष्टीची भर पडली. ती म्हणजे ऑटोमन साम्राज्याने खिस्ती राज्यांना अटलांटिक महासागराच्या किनाऱ्यावरच दाबून ठेवले होते. युरोपचा हा किनारा ओलांडून अद्याप पलीकडे कोणी गेले

नव्हते. पोर्तुगीज सागरी सत्तेचा शिल्पकार प्रिन्स हेन्री (१३९४ ते १४६०) हा नाविकराज होता. त्याच्या काळी इस्लामी साम्राज्य बाल्कन द्वीपकल्पाच्या आणि हंगेरीच्या ख्रिस्ती प्रदेशावर धडका मारीत होते. १३९६ मध्ये हंगेरीचा राजा सिगिसमुंड याच्या सैन्याचा निकोपोलिस येथे तुर्कांनी धुव्वा उडविला. पुढे १४५३ मध्ये तर ऑटोमन बादशहा दुसरा मेहमूद याने कॉन्स्टँटिनोपल सर केले. १४६० मध्ये ग्रीसचा मोरिया प्रदेश हासुद्धा ऑटोमन साम्राज्याला जोडला गेला होता.

याच वेळी पश्चिमी ख्रिस्त्यांना अनुकूल अशी एक घटना घडून आली. तिने सागरी जगावर ताबा मिळण्याची चावी त्यांना सापडली. ही घटना म्हणजे टागुस नदीच्या मुखापासून युरोप आणि आफ्रिका यांना जोडणाऱ्या जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीपर्यंतची किनारापट्टी पोर्तुगाल आणि स्पेन यांच्या ताब्यात आली. कॅस्ताइलने १२६२ मध्ये कॅडिझ आणि १३०९ मध्ये जिब्राल्टर जिंकून घेतले. १४१५ मध्ये आफ्रिकेच्या बाजूचे वयएटा जिंकले. १५ व्या शतकात आफ्रिकेतील मूळ प्रदेश आणि आयेबरियन द्वीपकल्प तसेच क्रायमिया आणि व्होल्गा खोरे या प्रदेशाच्या सरहद्दीवरील इस्लामी साम्राज्याची पकड ढिली होत होती. पण त्याचवेळी ऑटोमन साम्राज्याला भरती येत असल्यामुळे दोन्ही दिशांनी ते पसरतही होते. १५ व्या शतकात जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीच्या दक्षिण किनाऱ्यापासून सेनेगलपर्यंतची किनारा-पट्टी इस्लामी जगाच्या ताब्यात होती. १४९२ पर्यन्त ग्रानाडाचा सागरी किल्लाही मूर राजांच्या ताब्यात होता. या ऐतिहासिक वर्षात कॅस्ताईल आणि आरागॉन यांच्या राजांनी ग्रानाडाचा किल्ला सर केला. त्यानंतर २१४ दिवसांनी त्याच्याच आश्रयाने कोलंबस पालोस बंदरातून आपल्या सफरीला निघाला. १५१६ मध्ये ऑटोमनच्या आरमाराने अॅल्जिअरचा ताबा घेतला. हाच प्रयत्न ऑटोमन सम्राटांनी २५ वर्षांपूर्वी केला असता तर त्यांच्या हातून ग्रानाडा गेला नसता. इतकेच नव्हे तर त्या द्वीपकल्पाचा हातातून गेलेला प्रदेशही त्यांना मिळविता आला असता आणि पोर्तुगीजांच्या आलग्रेव्ह तळाला आणि खुद्द लिस्बनला सुद्धा ते शह देऊ शकले असते. ही ऐतिहासिक संधी त्यांना साधता आली नाही; तरी पण तिची जाणीव त्यांना असावी असे दिसते. अमेरिकेच्या स्पॅनिश नकाशाची अरबीलिपीतील एक तुर्की प्रत उपलब्ध झाली आहे. त्यावरून तसे अनुमान करता येते. नव्या जगाचा हा अगदी पहिला नकाशा होय.

आर्थिक निकड आणि लोभीपणा या पाश्चात्यांच्या साम्राज्यविस्ताराच्या प्रेरणा होत्या. १५–१६ व्या शतकात पोर्तुगाल आणि १८–१९ व्या शतकात ब्रिटन यामुळेच साम्राज्यविस्ताराला प्रवृत्त झाले. पोर्तुगालच्या मानाने इंग्लंड अधिक सधन होते हे खरे असले, तरी ब्रिटनची वाढती लोकसंख्या स्फोटक स्वरूप धारण करू लागली होती. १७४० ते १८८० पर्यंत झपाट्याने वाढलेल्या लोकसंख्येला जर कशाचा हातभार लागला असेल तर तो इंग्लंडच्या औद्योगिक क्रांतीचा होय. ती क्रांती यशस्वी होण्याला ब्रिटन "जगाचा कारखाना" बनणे अवश्य होते. त्यासाठी जगाच्या बाजारपेठा जिंकण्याकरिता ब्रिटनला पोर्तुगालप्रमाणेच सागरी जगाची सम्राज्ञी होणे आवश्यक होते.

१७६० पासून इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांतीचे युग सुरू झाले. त्याचे कारण काय? १६६०–६२ च्या दरम्यान तेथे रॉयल सोसायटीची स्थापना झाली. त्यानंतर शास्त्रीय ज्ञानाचा बुद्धिपुरःसर आणि पद्धतशीर विकास सुरू झाला. इतकेच नव्हे तर ते ज्ञान तंत्रविद्येच्या वाढीकरिता जाणीवपूर्वक उपयोजिण्यात येऊ लागले. याबाबतीत पोर्तुगाल इंग्लंडच्या पुढे दोन शतके होते. नाविकराज प्रिन्स हेन्री याने आपल्या काळातील सर्व सैद्धांतिक आणि व्यावहारिक ज्ञान एकत्र करून ते नौकानयन विद्येच्या कामी उपयोगात आणले. त्याकाळी बहुधा चिनी लोक पाश्चात्यांपेक्षा या विद्येत पुढे असावेत. त्यांनी मनात आणले असते, तर पाश्चात्यांच्या साम्राज्यविस्ताराला पायबंद घालण्याचे त्यांना अशक्य नव्हते. पण चीनच्या साम्राज्यसरकारला विस्ताराची एवढी निकडही भासत नव्हती. म्हणून प्रिन्स हेन्री आणि त्याचे सहकारी यांनी संशोधनपूर्वक तयार केलेल्या शीडांच्या जहाजांच्या साहाय्याने पोर्तुगीजांना सागरावर प्रभुत्व संपादन करता आले. त्यांच्या जहाज बांधणीत हिंदी महासागर, भूमध्यसागर आणि युरोपचा अटलांटिक किनारा यावरील नौकानयनाच्या समग्र अनुभवाचा संयोग झाला होता. अरबी समुद्र हे सागरी पर्यटनाचे अगदी आरंभीचे क्षेत्र होते. खिस्तपूर्व ३००० वर्षांच्या सुमारास सुमेरी संस्कृतीचा प्रभाव मेसापोटेमिया आणि उत्तर इजिप्तपर्यंत पडला होता, असे इजिप्तचे इतिहासकार सांगतात. इराणचे आखात आणि तांबडा समुद्र या नाविक मार्गाने होणारे दळणवळण आणि पुरातत्त्वविद्येने लावलेले संशोधन यावरून दिसून येते की, खिस्तपूर्व तिसऱ्या सहस्रकात सिंधु संस्कृती आणि सुमेरी संस्कृती यांच्यात संपर्क होता. या दोहोत दळणवळण सागरी मार्गानेच होत असले पाहिजे.





ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकात ग्रीक खलाशी इजिप्तच्या तळावरून अरबस्तान किंवा बलुचिस्तान यांच्या किनाऱ्याला स्पर्श न करता बाबेल-मांडेपच्या सामुद्रधुनीतून सिंधु नदीच्या मुखापर्यंत मान्सून वाऱ्यांच्या साहाय्याने सरळ जाऊन पोहोचत असत. मध्ययुगाच्या आरंभी हिंदी महासागरातील नाविक विद्या आणि कला ही अरबांनी भूमध्य सागरात नेली. मध्यंतरीच्या काळात बर्बरांनी युरोपच्या अटलांटिक किनाऱ्यावर एक नव्या प्रकारच्या मजबूत जहाजाचा शोध लावला होता. ते जहाज सागरी वारे आणि लाटा यात चांगल्याप्रकारे टिकाव धरू शकत असे. ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात व्हेनेटी जिंकताना सीझरने हे जहाज पाहिले होते. त्याचा प्रभाव त्याच्यावर खूपच पडला होता.

१५ व्या शतकापासून ख्रिस्तीजगात जहाजांना वेगळे सुकाणू जोडण्याची पद्धती सुरू झाली. तत्पूर्वी जहाजाचे मार्गदर्शन वल्ह्यांच्या साहाय्याने होत असे. त्याच सुमारास होकायंत्रही वापरात येऊ लागले होते. नाविकराज हेन्रीच्या काळात जहाजांच्या बांधणीत यांचा समावेश झाला होताच. पण त्याशिवाय शीडाचे जहाज त्याने तयार केले होते; आणि त्यावर तोफा सज्ज ठेवण्यात येत होत्या. पुढच्या चार शतकात जहाजांच्या या प्रकाराच्या बांधणीत आणि सरंजामात क्रमशः सुधारणा होत गेली. त्यातून अखेरीस १९ व्या शतकात शीघ्रगतीने क्लिपर जहाज तयार झाले. त्या मागोमाग यांत्रिकरीत्या चालणारी जहाजे तयार होऊ लागली. तरीपण २० व्या शतकाच्या सुरवातीपर्यंत शीडाची जहाजे बऱ्याच प्रमाणात वापरात होती.

## साम्राज्यविस्ताराच्या तीन लाटा

हा चार शतकांचा काळ म्हणजे पश्चिम युरोपचे जगावरील वर्चस्व वाढण्याचा काळ होय. या सबंध काळात शीडाचे जहाज हेच दळणवळणाचे सर्वांत प्रभावी साधन होते. या अवधीत पश्चिम युरोपात उगम पावलेल्या साम्राज्यविस्ताराच्या दोन लाटांनी एकामागोमाग साऱ्या जगभर धडका दिल्या. पहिली लाट पोर्तुगीज आणि स्पॅनिश लोकांची होती. ही लाट १५ आणि १६ या दोन शतकात टिकून राहिली. १५८८ मध्ये इंग्लंडने स्पेनच्या आरमाराचा धुव्वा उडविल्यानंतर ही लाट ओसरू लागली. त्यावेळी स्पेन आणि पोर्तुगाल यांचे संयुक्त राज्य असल्यामुळे पोर्तुगाललाही हा तडाखा बसला. साम्राज्यविस्ताराची दुसरी लाट डच, ब्रिटिश आणि फ्रेंच यांची होती. ही









१६ व्या आणि १७ व्या शतकात जी पसरली ती दुसऱ्या महायुद्धापर्यंत टिकून राहिली होती.

पाश्चात्यांच्या शीडांच्या जहाजांचा सर्वात मोठा फायदा म्हणजे समुद्रात ती दीर्घकाल राहू शकत असत. त्यांना मर्यादा पडत होती ती पिण्याच्या पाण्याच्या साठ्याची आणि शीडांच्या मजबूत दोरांची. नेल्सन हा निदान एका प्रसंगी तरी एका वर्षापेक्षा अधिक काळ सतत समुद्रावर राहिला होता. जुन्या अनेक वल्हयांच्या जहाजांना खलाशी मोठ्या संख्येने लागत असत ही त्यांची मोठी अडचण असे. त्यांच्या खाण्यापिण्याच्या आणि झोपेच्या सोयीकरिता वारंवार किनाऱ्याला लागणे भाग पडत असे. पोर्तुगीजांच्या कल्पकतेने जे नवे जहाज तयार झाले त्यामुळे प्रथमच खऱ्या अर्थाने जगत् संचारांच्या भाषेत विचार करणे शक्य झाले. १४९२ साली कोलंबसाने अमेरिकेच्या नव्या भूमीचा शोध लावल्यानंतर ख्रिस्ती जगाबाहेरील पृथ्वीच्या विभागणीचा प्रश्न उत्पन्न झाला. १४९३ सालच्या पोपच्या आज्ञापत्राने नव्या जगाची विभागणी पोर्तुगाल आणि स्पेन या दोन राष्ट्रांत केली. पुढे स्पेन आणि पोर्तुगाल यांच्यात तह झाल्यामुळे १४९४ मध्ये पोपने त्या आज्ञापत्रात बदल करून पृथ्वीच्या दोन्ही ध्रुवांना जोडणाऱ्या रेखांशापासून केप वेल्दच्या पश्चिमेला ३७० लीग या रेषेच्या पश्चिमेकडचा भाग पोर्तुगालला दिला. पुढे मागेलन याने १५१२ साली पृथ्वीप्रदक्षिणा पुरी केल्यामुळे अटलांटिक प्रमाणेच पॅसिफिक महासागराच्या विभागणीचा प्रश्न उत्पन्न झाला. पोर्तुगालने मोलक्का बेटावर आणि स्पेनने फिलीपाईन बेटावर ताबा मिळविला. अमेरिका खंडात पोर्तुगालने ब्राझिल आणि स्पेनने अमेरिकेचा मध्य आणि दक्षिण भागही काबीज केला. अमेरिकेतील स्पेनच्या ताब्यात असलेला प्रदेश अधिक महत्वाचा होता. फिलीपाईन बेटे मेक्सिकोच्या व्हाईसरॉयच्या ताब्यात देण्यात आली होती आणि त्यांच्यात दळणवळण वर्षातून दोन वेळा होणाऱ्या सफरींनी होत असे. या उलट पोर्तुगालचे आशियातील साम्राज्य अधिक महत्वाचे आणि कितीतरी मोठे होते. याचे श्रेय आल्फान्सो आलबुकर्क या पोर्तुगीज व्हाईसरॉयला दिले पाहिजे. तो मोठा कल्पक आणि दूरदृष्टीचा पुरुष होता. आशियातील अगदी मोक्याच्या जागा हेरून त्याने त्यावर त्वरेने झडप घातली. १५०९ मध्ये त्याची नेमणूक झाल्यानंतर लगेच पुढच्यावर्षी त्याने गोवा घेतले आणि भारताने ते परत जिंकून घेईपर्यंत आशियातील पोर्तुगीज साम्राज्याची ती राजधानी होती. १५११ त त्याने मलाक्काचा ताबा मिळविला.

१५१४ पर्यंत त्याने मोरोक्को बेटे जिंकली. १५१५ त होर्मुज बेटावर आक्रमण केले आणि इराणच्या आखातात प्रवेश मिळविला. १५१३ मध्ये एडन घेण्याचा त्याचा प्रयत्न फसला, तरी १५०६ मध्ये पोर्तुगीजानी सोकोत्रा बेट आधीच काबीज केले होते. १५२० मध्ये त्यांनी तांबडचा समुद्राच्या आफ्रिकी किनाऱ्या॰ वरून इथिओपिआच्या ख्रिस्ती राज्याशी संबंध जोडल्यामुळे बाबेलमांडेपच्या सामुद्रधुनीवर त्यांना वर्चस्व प्रस्थापित करता आले. १५१७ मध्ये पोर्तुगीज जहाजे कँटन बंदरात उतरली होती. १५१७ साली त्यांनी जपानमध्ये प्रवेश मिळविला. त्याच वर्षी चीनी सम्राटाने मकावमध्ये वसाहत स्थापन करण्याला त्यांना परवानगी दिली.

पोर्तुगीजांनी हिंदी महासागरावर आणि चीनी समुद्रावर एक शतकभर आपले वर्चस्व टिकविले. पोर्तुगीजाशिवाय दुसऱ्या कोणत्याही जहाजांना या सागरावर निरंकुशपणे वावरणे त्यांनी अशक्य करून टाकले होते. पण लौकरच त्यांची ही सद्दी ओसरली. इंग्लंडने स्पॅनिश आरमाराचा पराभव केल्यानंतर पोर्तुगीज साम्राज्य कोसळले आणि स्पेनच्या साम्राज्याला उतरती कळा लागली. अशाप्रकारे पोर्तुगाल आणि स्पेन यांच्या साम्राज्यविस्ताराची पहिली लाट ओसरली.

जगावर आघात करणारी पश्चिमेची दुसरी लाट फ्रेंच, ब्रिटिश आणि डच यांची होती. पहिली लाट ओसरल्यानंतर हे तिघेही एकाच वेळी पुढे सरसावले. या तिघांनीही मोठी साम्राज्ये स्थापन केली आणि पुढच्या साडेतीन शतकात ती उपभोगली. दुसऱ्या महायुद्धाच्या खाईत एकसमयावच्छेदे-करून त्याना त्या साम्राज्यावर पाणी सोडावे लागले. म्हणून या तिहींचाही विचार एकत्र केला पाहिजे. यामध्ये ब्रिटनचा वाटा इतका मोठा आहे की, त्याचा स्वतंत्रपणे विचार करणे प्राप्त आहे.

## स्पेन–पोर्तुगालच्या पिछेहाटीची कारणे

तत्पूर्वी पोर्तुगीज आणि स्पॅनिश यांची सत्ता का ओसरली आणि या तीन राष्ट्रांना कसा आणि का वाव मिळाला हे तपासले पाहिजे. पोर्तुगाल आणि स्पेन यांची जगाच्या सागरावर हुकुमत होती. या दोहोंमध्ये जगाची विभागणी करण्यात आली होती. १५८१ ते १६४० या काळात ही एकत्र आली होती. हे दोन्ही देश जवळ जवळ आठ शतके मुस्लिम सत्तेबरोबर सतत झगडा देऊन तयार झाले होते. त्यांनी निर्धाराने मुसलमानाकडून आपला मुलूख परत मिळविला होता. ज्यावेळी त्यांनी सागरी संचाराचा आक्रमक

अनुक्रमणिका

पवित्रा घेतला त्यावेळी त्यांनी जी साहसी वृत्ती, जे धाडस, जी निर्भयता प्रकट केली त्याची बरोबरी त्यांच्या मागून आलेल्या आणि त्यांच्यापेक्षाही अधिक यशस्वी ठरलेल्या डचांना, फ्रेंचांना आणि इंग्रजांनाही करता आली नाही. असे जर होते तर स्पॅनिश आणि पोर्तुगीज हे अपयशी का ठरले ?

त्याचे एक कारण म्हणजे एवढ्या विस्तीर्ण भागावर पसरलेल्या साहसकार्यासाठी लागणारे माणूसबळ त्यांच्यापाशी पुरेसे नव्हते. आयबेरियाचे द्वीपकल्प पायरिनीज पर्वताच्या उत्तरेकडील युरोपीय देशाप्रमाणे किंवा आल्प-सच्या दक्षिणेकडील इटलीप्रमाणे दाट लोकसंख्येचे पोषण करण्याला निसर्ग-तःच असमर्थ होतें. पोर्तुगाल शेतीप्रधान असला तरी त्याचे क्षेत्र लहान होते. अपुरे माणुसबळ हे तितकेसे सबळ कारण म्हणता येत नाही. कारण याच पोर्तुगालने त्याच्यापाशी असणाऱ्या माणुसबळाच्या साहाय्याने आफ्रिका आणि आशिया खंडात नाविकतळ आणि बाजारपेठा स्थापन करून चांगला जम बसविला होता. १५४१ मध्ये त्यांनी इथिओपिआवर स्वारी केली तेव्हा तेथे मर्यादित प्रमाणात का असेना पण त्यांनी आपले माणुसबळ वापरले होते. स्पॅनिश लोकांनी मध्य अमेरिकेत आणि पेरूमध्ये तेथील प्राचीन संस्कृतीच्या लोकांना इतक्या निर्दयतेने चिरडून टाकले की, त्यांच्यातील सारी चेतनाच त्यानी करून टाकली. त्याना पुन्हा डोके वर काढणेही अशक्य झाले. स्पेनच्या साम्राज्याचा विस्तार केप हॉर्न आणि प्लेट नदीपासून कॅलिफोर्नियाच्या उत्तर किनाऱ्यापर्यंत पसरला होता. स्पेनने आपले विस्तीर्ण साम्राज्य तीन शतकेपर्यंत आश्चर्यकारक रीतीने सांभाळले आणि तेही केवळ मूठभर सैनिक, पाद्री, कायदेपंडित आणि जमीनदार यांच्या जोरावर. स्पॅनिश साम्राज्याचे विसर्जन झाल्यानंतर त्यापैकी युनायटेड स्टेटस्सारख्या काही थोड्या स्वतंत्र देशात युरोपच्या भिन्न भिन्न देशातून वसाहत करण्याकरिता लोक गेले. स्वतंत्र झालेल्या स्पॅनिश अमेरिकेत स्पॅनिश सैनिकांची संख्याच अधिक होती. स्पेनने फिलिपाईन बेटे ताब्यात ठेवली ती सुद्धा मूठभर सैनिक, अधिकारी आणि पाद्री यांच्या जोरावरच होय.

शिवाय ज्यावेळी संयुक्त नेदरलंड आणि इंग्लंड यांनी पोर्तुगीजाकडून आशियातील वर्चस्व हिरावून घेतले, त्यावेळी त्यांची लोकसंख्या कमीच होती. १८ व्या शतकाच्या अखेरीस पाश्चात्य जगात फ्रान्स सर्वात अधिक दाट लोकवस्तीचा देश होता. १९ व्या शतकात मात्र इंग्लंड, जर्मनी आणि अमेरिका यांनी लोकसंख्येच्या बाबतीत फ्रान्सला मागे टाकले. पाश्चात्य साम्राज्यवादाच्या दुसऱ्या लाटेतील राष्ट्रांपैकी फ्रान्स हे लोकसंख्येने मोठे

असूनही सर्वात कमी उत्साही आणि म्हणून अखेरीस अपेशी ठरले हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

याचे कारण असे की, नेपोलियनी युद्धे संपल्यानंतर युरोपातील कोणत्याही देशापेक्षा फरान्सची लोकसंख्या अधिक होती; तशीच त्याच्यापाशी उत्तम प्रतीची शेतजमीन सर्वात अधिक होती. ब्रिटनची शेतजमीन फरान्सच्या अवघी ½ आहे. ग्रेट ब्रिटनने १८ व्या शतकाच्या उत्तरार्धापर्यन्त शेती आणि पशुसंवर्धन यांच्या विकासाला हातही घातला नव्हता. संख्येने मोठा असलेला फरेंच शेतकरीवर्ग क्रांतीपूर्वी सामाजिक अन्यायाखाली भरडून निघत होता. त्यांच्या जमिनी इतक्या चांगल्या प्रतीच्या होत्या की, आपला देश सोडून सागरापलीकडील सेंट लॉरेन्सचे खोरे किंवा मिसिसिपीच्या मुखाचा प्रदेश यात वसाहत करून स्थायिक होणे त्याना तितकेसे आकर्षक वाटत नव्हते.

स्पेन आणि पोर्तुगाल यांच्या साम्राज्यवादाच्या पहिल्या लाटेच्या ओसरणीचे अधिक प्रभावी कारण म्हणजे या द्वीपकल्पातील लोकांची आर्थिकदृष्टचा अक्षमता हे होय. मध्ययुगात जेव्हा व्हेनिसवासी, जिनोआवासी आणि लोंबार्ड जन हे फ्लेमिंग आणि डच तसेच हॅन्सिआटिक नगरातील जर्मन लोक यांच्याशी व्यापार करीत, तेव्हा त्यांची गाठ परिचितांशी पडत असे. पोर्तुगीजानी जेव्हा केप ऑफ गुडहोपला वळसा घातला आणि दक्षिण आणि पूर्व आशियाचा व्यापार ताब्यात घेऊन व्हेनिस, इजिप्त आणि सीरिया यांच्याशी चालणारा उत्तर इटलीचा व्यापार मुसलमानांपासून हिरावून घेतला, तेव्हा या द्वीपकल्पातील लोक उत्तर युरोपातील धूर्त लोकांशी व्यापारात बरोबरी करू शकले नाहीत. स्पॅनिश लोकांनी इन्कामधून आधाशीपणे लूट मिळविली होती आणि तेथील खाणीतून दीर्घोद्योगाने मौल्यवान धातू पैदाकरून त्यापासून अमाप संपत्ति पदरात पाडून घेतली होती. पोर्तुगीजानी इंडोनेशियातून सरळ आयात केलेले मसाल्याचे जिन्नस आणि स्पॅनीआर्डानी अॅटेलिसमध्ये पैदा केलेली साखर आणि इतर उष्णकटिबंधी पिके यापासून गडगंज नफा मिळविला होता. या नफ्यापैकी बरासचा भाग नेदरलंडच्या धूर्त व्यापाऱ्यांच्या खिशात जात होता. ऱ्हाईन, म्यूज आणि शेल्ट या नद्यांच्या मुखाजवळचा प्रदेश आणि अरुंद समुद्रपट्टीने इंग्लंडशी जोडला जाणारा त्यांचा दुवा यामुळे डचभूमीला मोक्याचे स्थान प्राप्त झाले होते. त्यामुळे स्पॅनिश आणि पोर्तुगीज आपल्या साम्राज्यातून जो माल आयात करीत तो युरोपीय बाजारपेठात खपविण्याकरिता दलाल या नात्याने डच व्यापाऱ्यांची त्याना गरज होती. स्पेन आणि पोर्तुगाल यांच्या साहसाची फळे या दलालाना मिळत होती. हा यातील एक विरोधाभास होता. डचांची

भरभराट होत असताना हे देश मात्र हलाखीला पोचत होते आणि पुढच्या अर्ध्या शतकाच्या अवधीत जागतिक व्यापाराचे जे मक्तेदारीचे स्थान त्याना मिळाले होते त्यातून ते हुसकले जात होते.

पण १६ व्या शतकात पोर्तुगीजांच्या आणि १९ व्या शतकात स्पॅनिश लोकांच्या आशियाई साम्राज्याला जो पराभव पत्करावा लागला त्याचे मुख्य कारण लोकसांख्यिक किंवा आर्थिक नव्हते. तर या द्वीपकल्पातील ख्रिस्त्यांची कडवी धार्मिक वृत्ती आणि धोरण यात ते सापडते. पण त्यांच्या लष्करी काटकपणाप्रमाणेच हाही त्यांचा एक वारसा होता. मुस्लीम शेजाऱ्या-बरोबर आठ शतके चाललेल्या झगडयातून त्याना तो मिळालेला होता.

इस्लामची दोन ठळक वैशिष्टये होती. त्याच्यामध्ये जवळीकीचे बंधन इतके बळकट असते की कोणीही मुस्लीम कोणत्याही मुस्लीम बांधवाशी कोणतेही वांशिक वगैरे भेद न मानता लग्न करील. मुस्लीम राज्य मानले आणि जादा कर दिला म्हणजे इतर धर्मीयांना सहनशीलता दाखवावी, त्यांचे रक्षण करावे, त्यांच्या पूर्वापार चालीरीतीप्रमाणे त्यांचा धर्म अनुसरण्यास त्यांना मुभा द्यावी असे कुराणमध्ये सांगितले आहे. इस्लामने अशीच सहिष्णुता झरथुष्ट्राच्या अनुयायांच्या बाबतीत आणि हिंदूंच्या बाबतीतही दाखविली होती. इस्लामची ही सहिष्णुता रोमन कॅथोलिक पंथियांनी दाखविली नाही. स्पेनमध्ये जी सहिष्णुता पूर्वीच्या त्याच्या मुस्लीम राज्यकर्त्यांनी दाखविली होती ती पुढे रोमन कॅथोलिक विसरले आणि त्यांनी इस्लाम धर्मीयांना हुसकून लावले. इतकेच नव्हे तर त्यांची कत्तल करण्यासही त्यांनी कमी केले नाही.

पोर्तुगीजांचे धर्मवेड त्यांना जपानमध्ये भोवले. पोर्तुगीजांचा जपानमध्ये प्रथम प्रवेश झाला त्यावेळी जपान्यांनी त्यांचे स्वागत केले, जपान्यांनी मोठ्या औत्सुक्याने त्यांची दारुगोळ्याची अस्त्रे, त्यांचे रंगीबेरंगी पोषाख ही उचलली. इतकेच नव्हे तर अनेकांनी त्यांचा धर्मही स्वीकारला होता. ज्याप्रमाणे सहाव्या आणि सातव्या शतकात जपानवर बुद्धधर्माने मोहिनी घातली होती तशीच मोहिनी १६ व्या शतकात पश्चिमेचा ख्रिस्तीधर्म घालतो की काय असे वाटत होते. बुद्धधर्म इतर धर्मांना आपल्याबरोबरच गुण्यागोविंदाने नांदू देतो. जपानी माणूस बुद्धधर्मी असूनही तो शितोधर्म किंवा कॉन्फ्यूशियसचा धर्म हाही आचरणात आणू शकतो. या उलट ख्रिस्ती मिशनरी असहिष्णु होते आणि जपानमध्ये आलेल्या ख्रिस्ती मिशनऱ्यांचा पोर्तुगीज व्यापारी आणि पोर्तुगीज

सरकार यांच्याशी घनिष्ट संबंध होता. स्पेनने १५६५ मध्ये फिलिपाईन बेटे व्यापली. त्यावेळी स्पेन आणि पोर्तुगाल यांचे ऐक्य असल्यामुळे पोर्तुगीज मिशनरी आणि व्यापारी हे जपानपर्यंत येऊन दाखल होऊ शकले. मिशनऱ्यांच्या प्रचारामुळे जपानमध्ये धर्मांतर फार मोठ्या प्रमाणावर होऊ लागले. इतके की जपानला ते धोकादायक ठरण्याचा संभव निर्माण झाला. याच काळात जपानमध्ये अंतर्गत राजकीय संघटन जोमाने चालू होते. त्याची परिणती जपानमध्ये प्रबल मध्यवर्ती सत्ता स्थापन होण्यात झाली. त्यावेळी जपानचा हुकूमशहा हिडेयोशी हा होता. जपानातील यशामुळे स्पॅनिश व्यापारी हे मस्तीला चढले. त्यांनी जपानला आव्हान द्यायला सुरुवात केली. जपानच्या बंदरात अडकून पडलेल्या स्पॅनिश जहाजाच्या कप्तानाने जपानी अधिकाऱ्यांना दम भरायला सुरुवात केली. त्याने अशी शेखी मिरविली की, स्पेनच्या बादशहाने पंचमस्तंभीयांच्या जोरावर आपले साम्राज्य जगभर वाढविले आहे. बाटलेल्या एतद्देशीय ख्रिस्त्यांना उद्देशून त्याने " पंचमस्तंभी " हा शब्द वापरला होता. जपानचे अधिकारी आणि जपानचे सरकार हे वेळीच शहाणे झाले. १५४२ पासून १५८७ पर्यंत जपानने स्पॅनिश व्यापाऱ्यांना आणि मिशनऱ्यांना स्वैर मोकळीक दिली होती. पण वरील प्रकार घडल्यानंतर त्यांनी हात आखडता घेतला आणि हळुहळू ख्रिस्ती मिशनऱ्यांची आणि पोर्तुगीज व्यापाऱ्यांची जपानमधून हकालपट्टी केली आणि ज्यानी ज्यानी ख्रिस्तधर्म स्वीकारला होता त्यांना तो सोडून द्यायला भाग पाडले.

इथिओपिआतही असेच घडले. इथिओपिआ हा पोर्तुगीजांचे तेथे आगमन होण्यापूर्वी जवळ जवळ १ हजार वर्षे ख्रिस्तधर्मी देश होता. १५४१ ते ४३ च्या दरम्यान मुसलमानांच्या आक्रमणापासून पोर्तुगालने इथिओपिआचे रक्षण केले होते. पण इथिओपिअनांचा ख्रिस्तीधर्म हा प्राचीन काळच्या परंपरेतला होता. त्यांच्यावर जेझुइटांनी आपला रोमन कॅथोलिक पंथ लादण्याचा प्रयत्न केला. त्याची उलट प्रतिक्रिया होऊन १६३३ मध्ये इथिओपिआतून पोर्तुगीजांची हकालपट्टी झाली.

यावरून दिसून येईल की पोर्तुगाल आणि स्पेन या द्वीपकल्पातील राज्यांची आर्थिक असहाय्यता आणि त्यांचे पराकोटीचे धर्मवेड या दोन घटकामुळे पूर्वेकडील साम्राज्यविस्ताराच्या कार्यात त्यांची पिछेहाट झाली आणि इतर युरोपीय देशांना तेथे वाव मिळाला. येथे हे लक्षात ठेविले पाहिजे की, जपानी लोक हे याबाबतीत सावध होते. १६३८ मध्ये जपा-

नातील ख्रिस्ती लोकांचे बंड मोडून काढण्याच्या कामी त्यानी डचांच्या युद्धनौकेचे साहाय्य घेतले. पण त्यांनी डचांना आपल्या भूमीवर थारा दिला नाही. त्यांनी डचांना परदेशी व्यापाराची जरी मक्तेदारी दिली होती, तरी त्यांना ते अत्यंत अपमानास्पद रीतीने वागवीत होते. पण व्यापारामध्ये मिळणाऱ्या भरमसाट नफ्याकडे पाहून डच हे सहन करीत होते. फिलिपाईन्स-मधील स्पॅनिश राजवटीबद्दल बोलायचे तर ते व्यवहारतः ख्रिस्तधर्मी राज्य झाले होते. पॅराग्वेमध्ये जेझुइटानी हाच उपक्रम आरंभिला होता. पॅराग्वेमध्ये जेझुइटानी धर्मान्तर फार मोठ्या प्रमाणावर केले आणि तेथील कारभार त्यांच्याच हातात होता. फिलिपाईनमध्ये पाद्री लोकांच्या हाती राज्य होते. या स्पॅनिश पाद्र्यांचे राज्य शेवटी इतके जुलमी झाले की, ख्रिस्त्यासकट इतर धर्मीयांनी १८९६ मध्ये त्यांच्याविरुद्ध बंड उभारले. फिलिपाईन जनतेच्या प्रतिकाराची चळवळ इतकी जोरदार होती की, तिच्या जोरावर ते स्पेनपासून स्वातंत्र्य मिळवू शकले असते. पण त्याच-वेळी स्पेन-अमेरिकेचे युद्ध जुंपून त्यात स्पेनचा पराभव झाला आणि फिलिपाईन्स अमेरिकेच्या ताब्यात गेले फिलिपाईन्समधील अमेरिकेची राज-वट ही स्पेनपेक्षाही अधिक जुलमी ठरली. तेथील स्वातंत्र्याची चळवळ १८९९–१९०१ च्या दरम्यान अमेरिकन सैन्याने दडपून टाकली. त्या-नंतरच्या काळात अमेरिकेने शिक्षण आणि इतर सुखसोई देण्याच्या बाब-तीत बरीच प्रगति केली. पण त्यांनी फिलिपाईनला स्वातंत्र्य दिले नाही. ते त्यांना दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर मिळाले. याचवेळी आशियातील पाश्चात्यांची साम्राज्ये संपुष्टात येत होती.

( अपूर्ण )



अनुक्रमणिका

श्री. ग. वा. तगारे

# "ज्ञानदेवांच्या कालखंडाची साधने"

## ( काही विचार )

प्रा. घोंगे यांचा 'नवभारत'मासिकाच्या सप्टेंबर १९७३ चे अंकातील वरील विषयावरील लेख वाचला. मत्स्येंद्र-गोरक्षादी ज्ञानदेवांचे गुरुपरंपरेतील नाथपंथीसिद्ध व ज्ञानदेव याच्या कालखंडातील तफावत भरून काढण्यासाठी त्यांनी ज्ञानदेवविषयक संतवाङमयातील उल्लेखांचे जे मूल्यमापन केले व ज्ञानदेवाबद्दल जे निष्कर्ष काढले त्यामुळे मी एकाकाळी हातावेगळा केलेल्या विषयावर पुनः लिहीत आहे.

प्रा. घोंगे ह्यानी ज्ञानदेवाबद्दल पुढील निष्कर्ष काढले आहेत :

१ ) ज्ञानदेवांचा जन्म परंपरेने मानतात त्याप्रमाणे शके ११९३ मध्ये झाला नसून शके १०९३ मध्ये झाला. ( पृ. २२ )

२) ज्ञानदेवांची हयात निदान ६५ वर्षांची असावी. पृ. ( २३ )

३) ज्ञानदेवाना संसारसुखाचा अनुभव असावा. ( पृ. २५ )

४) शके १२१२ हा ज्ञानेश्वरी-लेखनाचा शक नसून सच्चिदानंद नामक लिपिकाने (scribe) त्या ग्रंथाचे पुनर्लेखन-नक्कल-केव्हा केली याबद्दलचा असावा. ( पृ. १३ )

५) नामदेव व ज्ञानदेव यांचेमध्ये निदान एक शतकाचे अंतर असावे.

चर्चेच्या ओघात ज्ञानदेवांचे वय राजा रामदेवराव यादवापेक्षा अधिक होते ( पृ. १२ ) अशी विधाने केली आहेत. आद्य शंकराचार्यांचे मंडनमिश्रादि शिष्य त्यांच्यापेक्षा वयाने वडील होते हे लक्षात घेता अशी 'सिद्धान्त'– दर्शक विधाने तपासणे जरूर आहे असे वाटते. पण ते करण्यापूर्वी कोणते अभंग, पदे वा पुरावा विश्वसनीय मानावा याबद्दल प्रा. घोंगे यांनी कोणते निकष मानले आहेत किंवा कोणते दण्डक शास्त्रीय मानले जातात हे स्पष्ट केले तर या विषयावर लिहिण्यात स्वारस्य आहे. 'मला अडचणीचा वाटेल तो पुरावा अग्राह्य' अशी भूमिका असेल तर या विषयावर चर्चा करण्यात काहीच अर्थ नाही. तरी या पुराव्याच्या ग्राह्याग्राह्यतेबद्दलचे निकष प्राध्यापक घोंगे यांनी मांडल्यानंतर अधिक लिहिता येईल.

ज्ञानदेव व त्यांच्या गुरुपरंपरेतील नाथसिद्ध माणसे होती. त्याना अमाप आयुष्य देण्याचा भोळसरपणा बुद्धिवाद्यानी दाखवू नये. तेव्हा '१००–१२०

अशी आयुष्ये असणारे सिद्ध ' असे खोटे वलय निर्माण न करता ज्ञानदेवांचे गुरुपरंपरेचा विचार करणे आवश्यक आहे.

ज्ञानदेवानी दिलेली गुरुपरंपरा ( ज्ञानदेवीच्या दांडेकर प्रतीत ) पुढील-प्रमाणे आहे :




–या ओव्यांवरून ज्ञानदेवांची कल्पना अशी दिसते की त्यांच्या गुरुपरंपरेचे संस्थापक भगवान् शंकर ( आदिनाथ ) असून त्यांचेपासून मत्स्येंद्रनाथ अथवा मीननाथ याना ' अद्वयानंद वैभव ' मिळाले. मत्स्येंद्रानी नाशिक जिल्ह्यातील सप्तशृंगीच्या डोंगरावर भग्नावयव असलेल्या चौरंगीनाथाना ' सर्वांगी संपूर्ण ' केले. मीननाथ हे मत्स्येंद्राचे शिष्य वा पुत्र आहेत असे ज्ञानदेव मानत नाहीत. ' मीन ' व ' मत्स्य ' हे समानार्थक शब्द आहेत हे लक्षात घेता ' मत्स्येंद्रनाथ ' व ' मीननाथ ' एक आहेत ही ज्ञानदेवांची स्वतःच्या परंपरेची माहिती विश्वसनीय वाटते. मीननाथानी गोरक्षनाथाना अनुग्रह दिला व गोरक्षनाथानी हे ज्ञान गहिनीनाथाना दिले व गहिनीनाथापासून निवृत्तिनाथामार्फत ज्ञानदेवाना प्राप्त झाले.

या परंपरेतील पहिले मानवी गुरु मत्स्येंद्रनाथ याना काश्मीरी पंडित अभिनव गुप्त ( सुमारे ९५० ते १०५० ) याने आपल्या तंत्रालोकात वंदन केले आहे. यावरून मत्स्येंद्रांचा काळ इ. स. ९५० पूर्वीचा ठरतो. राहुल सांकृत्यायनानी तिबेटी परंपरेच्या आधारे मीनपा ( मीनपाद = मीननाथ ) अथवा ( ज्ञानदेवमते ) मत्स्येंद्र यांचा काळ राजा देवपालाचे (इ. स. ८१५ ते ५४ ) कारकीर्दीत मानला आहे. मत्स्येंद्रशिष्य गोरखनाथ हेही या राजाचे समकालीन होते ( राहुल सांकृत्यायन-सरहपादकृत दोहाकोष, भूमिका पृ. २२,

बिहारराष्ट्रभाषा परिषद-पटना, सन १९५७). याचा अर्थ असा की गोरक्षनाथ व गहिनीनाथ यांच्यात ४ शतकाचे अंतर येते. कारण गोरक्षनाथ ९ वे शतकात झाले व गहिनीनाथ ज्ञानदेवाना समकालीन म्हणजे इ. स चे १३ शतकातील.

कै. शं. वा. दांडेकरानी परंपरेच्या आधारे ज्ञानदेवांचा मांसवंश व विद्यावंश यांचा संबंध पुढीलप्रमाणे दिला आहे :




प्रत्येक पिढीची ३० वर्षांची आयुर्मर्यादा मानली तर त्र्यंबकपंताचा काळ ज्ञानदेवापूर्वी ९० वर्षे ठरतो. म्हणजे ज्ञानदेवांचा काळ इ. स. चे १३ वे शतक असेल तर गोरक्षनाथाचा काळ १२ वे शतक असेल.

* आणि त्यामुळे राजा देवपालाचे (इ. ८१५-५४) समकालीन गोरक्षनाथ व ज्ञानदेवांचे पणजोबा त्र्यंबकपंत यांचे मोक्षगुरू गोरक्षनाथ या व्यक्ती भिन्न आहेत हे स्पष्ट होते.

आपल्या वंशावळी किंवा शांकर किंवा माध्व आचार्यपीठावरील आचार्यांची नामावळी किंवा जैनांच्या गुर्वावली पाहताना काही ठराविक नावे वारंवार येत असतात. ज्ञानदेवांचे गुरुपरंपरेत असेच झाले असावे व जुन्याकाळातील कर्तबगार सिद्ध 'गोरक्ष' यांचे नाव धारण करणारे नाथपंथी सिद्ध ज्ञानेश्वरांचे पणजोबाना समकालीन होते.

आद्य शंकराचार्यांचे गुरुपरंपरेत शुक – गौडपाद – गोविंदयति यांची नावे आहेत. पण या प्रत्येक पुरुषात कित्येक शतकांचे अंतर आहे. याचा अर्थ इतकाच की काही ठळक कर्तबगार गुरूंची नावे देऊन बाकीची नावे गाळत असतील त्यामुळे देवपाल समकालीन सिद्धपुरुष 'गोरक्षनाथ' यांचे पासून गहिनीनाथांचे पर्यंतच्या पुरुषांची नांवे गाळण्यात आली असावीत, व ज्ञानदेवानी आपला ब्रह्मविद्यावंश आदिनाथ > मत्स्येंद्र > गोरक्ष ...... गहिनी > निवृत्ति असा दिला असावा.

गोरक्ष शतकात व गोरक्षसिद्धान्त संग्रह यात मीननाथ व मत्स्येंद्रनाथ एकच मानले आहेत व हे मत ज्ञानदेवानी ग्राह्य धरले आहे.

अनुक्रमणिका

सारांश ज्ञानेश्वरकाल ११९७ ते १२१८ हा स्वीकारण्यात ज्ञानेश्वरांचे गुरुपरंपरेप्रमाणे फार मोठा कालखण्ड पडतो म्हणून परंपरागत पुराव्याची अनावश्यक मोडतोड करण्यासाठी अट्टाहास करण्याचे कारण नाही.

"बुद्धिवादी" भूमिका स्वीकारणारांची अडचण अशी की ज्ञानदेवानी इतक्या लहानपणी ज्ञानदेवीसारखा प्रगल्भ ग्रंथ लिहिला कसा व त्याना संसारसुखाचा अनुभव नसताना त्यांनी त्यातील दृष्टांत दिले कसे? प्राचीन भारतीय मानसशास्त्रात समाधिस्थिती साधणाराला 'ऋतंभरा प्रज्ञा' प्राप्त होते असे म्हटले आहे (पतंजलि–योगसूत्र १.४८). या सूत्रातील 'ऋतंभरा प्रज्ञेचे' विवरण करताना व्यासानी 'या प्रज्ञेच्या ठिकाणी विपर्यस्त ज्ञानाचा वाससुद्धा असत नाही. ती केवळ सत्याचे आकलन करते' (अन्वर्था च सा। सत्यमेव बिर्भात, न तत्र विपर्यासज्ञानगन्धोऽप्यस्तीति ) असे म्हटले आहे. अर्वाचीन बुद्धिमापनशास्त्रज्ञानी सर्व माणसाना समानबुद्धी नसते, काही माणसे अलौकिक प्रज्ञेची ( genius ) असतात हे मान्य केले आहे. त्यामुळे सोईस्कर वाटले म्हणून कै. रा. द. रानडयांचे वचन आप्तवाक्याप्रमाणे उद्धृत केले ( पृ. १० ) म्हणून बुद्धिमापनशास्त्राचे सिद्धान्त चूक ठरत नाहीत. शिवाय तसा विचार केला तर ज्ञानेश्वरानी गीतेत जे दृष्टान्त दिले आहेत ते सर्वसाधारणपणे चाणाक्ष असणाऱ्या पुरुषास संसार न करता सुचण्यासारखे आहेत. तेव्हा 'ज्ञानदेवासारख्या प्रज्ञावंतास इतर सांसारिकांचे निरीक्षण करून ते सुचणे शक्य नाही त्यासाठी संसार केलाच पाहिजे' असे मानण्याचे कारण नाही. आणि ज्याअर्थी ज्ञानेश्वरी हे 'आचार्यांपेक्षाही अधिक व्याप्त आणि प्रासादिक असणारे गीताभाष्य' आहे ( पृ. १० ) असे प्रा. घोंगे मानतात त्या अर्थी ज्ञानदेवाना अलौकिक प्रज्ञा होती हे मान्य असावे असे दिसते. या ठिकाणी प्रा. घोंग्यानी 'आचार्यांचे' नाव न घेतल्यामुळे कोणते आचार्यभाष्य त्याना अभिप्रेत आहे हे स्पष्ट असले तरी लेखनाचे भरात अशी विधाने केली जातात त्यामुळे अशा विधानांची उपेक्षा करणे बरे.

सारांश ज्ञानदेव आम्हा प्राध्यापकापेक्षा प्रज्ञावंत असतील तर त्यानी १८ किंवा २१ वर्षांचे आयुष्यात संसारातील दृष्टांत असलेला व 'आचार्यापेक्षा अधिक व्याप्त व प्रासादिक ग्रंथ' कसा लिहिला याची अडचण वाटू नये.

ज्ञानदेवांचे ऐतिहासिक चरित्र उपलब्ध नाही. या निमित्ताने अधिक संशोधन व्हावे व चर्चेला चालना मिळावी अशी माझी सुद्धा इच्छा आहे. आणि त्या दृष्टीने प्राध्यापक घोंगे यांच्या लेखाचे मी स्वागत करतो.

प्रा. रंगनाथ कौलगुड

# फक्त शास्त्रज्ञांचे लाड काय म्हणून ?

चालू जमान्यातील विज्ञानाचे वाढते महत्त्व लक्षात घेता, विज्ञान क्षेत्रातील समस्यांचे पडसाद, सामाजिक जीवनात उमटले तर त्यात काय आश्चर्य ? गेल्या काही वर्षांत देशामध्ये दोनचार उच्चपदीय शास्त्रज्ञांनी आपल्या नोकरीचा उबग आल्यामुळे आत्महत्या केल्या. त्याबद्दल सर्वत्र हळहळ व्यक्त केली गेली. त्या कमनशिबी शास्त्रज्ञांनी अनुभवलेली वैफल्याची भावना प्रामाणिक होती, याबद्दल शंका घ्यायचे कारण नाही. या घटना वर्तमानपत्रातून चर्चिल्या गेल्या. शिवाय लोकसभेतही त्यावर गरमागरम प्रश्न-उत्तरे झाली. या पार्श्वभूमीवर काही मतलबी लोक असा सूर काढू लागले आहेत की शास्त्रज्ञांना वेगळे लेखा. ते आपले उपकारकर्ते आहेत. त्यांना खास वागणूक द्या.

वास्तविक निराशा ही केवळ शास्त्रज्ञांना वाटून दिलेली नाही. इतर व्यावसायिक क्षेत्रांतील उच्चाधिकाऱ्यांनाही त्याच प्रकारची लाल फितीची कुंचबणा भोगावी लागते. त्यांपैकी काही आत्महत्या करतातही. त्यांचाही आपल्या सहानुभूतीवर तेवढाच हक्क आहे, जेवढा या शास्त्रज्ञांचा होता. परंतु तसे घडत नाही. याचे कारण एकच. ते म्हणजे शास्त्रज्ञ हे इतरांच्या पेक्षा निराळे आहेत, अशी आपली करून दिलेली समजूत.

तेव्हा प्रश्न असा की शास्त्रज्ञ हा खरोखरच आपल्यापेक्षा वेगळा आहे का ? त्याच्यात आणि आपल्यात काही स्पष्ट व वैशिष्ठ्यपूर्ण भेद आहेत का ? तो निराळा वागतो का ? त्याला खास सवलती दिल्या पाहिजेत का ? हे सगळे प्रश्न आपण सर्वसामान्य माणसापुढे टाकले तर तो होयच म्हणेल. शास्त्रज्ञांना तर त्याने हेच उत्तर द्यावे असे वाटत असते. कारण त्यामुळे परस्पर त्यांच्या स्वार्थाची जपणूक होते. खरे म्हणजे विज्ञानामुळे समाजात ज्या समस्या निर्माण झाल्या आहेत, त्यांचा डोळस अभ्यास केला तर असे दिसून येईल की त्या समस्यांच्या मुळाशी शास्त्रज्ञ हे वेगळे समजले पाहिजेत, त्यांचे लाड केले पाहिजेत ही समजूतच होय.





यालाही काही कारणे आहेत. उदाहरणार्थ, ज्यावेळी बडी बडी शास्त्रज्ञ मंडळी सापेक्षतावाद, शुक्रग्रहावर पदार्पण, परमाणू अस्त्रे, जन्यु-इंजिनीयरिंग सारख्या गूढ आणि विस्मयजनक विषयांवर बोलतात किंवा लिहितात त्या वेळी इतरांना असा भास होतो की ही मंडळी महाज्ञानी आहेत आणि त्यांच्यात अख्ख्या विश्वाची उलथापालथ करण्याची कुवत आहे. शिवाय ही कुवत इतर कोणत्याही मानवी कुवतेपेक्षा निराळी आहे, अपरूप आहे.

दुसरे म्हणजे शास्त्रज्ञ वापरतात ती परिभाषा. त्यांचे सिद्धान्त आणि निष्कर्ष गणीती समीकरणांतून आणि सांकेतिक संज्ञांतून मांडले जातात. त्यांचा अर्थ केवळ त्या शास्त्रांचा अभ्यास केलेल्या व्यक्तींनाच समजू शकतो. इतरांना फक्त त्या शास्त्रज्ञांचे कौतुक वाटते !

तिसरे म्हणजे वैज्ञानिक पद्धतीबद्दलची घमेंड. तर्क, अनुमान, ताळा वगैरे माणसाच्या विचार करण्याच्या पद्धतीतील निरनिराळे टप्पे आहेत. विज्ञानात हीच पद्धत अवलंबिली जाते. परंतु विज्ञानाचा पुरस्कार करणाऱ्या लेखकांनी आरंभापासूनच वैज्ञानिक पद्धती हा मानवी विचारसरणीचा एक नवा आविष्कार आहे, असे लोकांच्या मनावर बिंबविण्याचा उद्योग आरंभिला.

या सर्वांचा परिपाक म्हणजे लोकांना असे वाटू लागले की वैज्ञानिक-पद्धती म्हणजे एक जादूची कांडी आहे आणि ती कांडी शास्त्रज्ञांच्या हाती आहे. म्हणून 'मानवजातीचे उपकारकर्ते' ही उपाधि जर कोणाला द्याव-याची असेल तर ती शास्त्रज्ञांनाच द्यायला हवी.

काही शास्त्रज्ञही या गंडाला बळी पडले आणि त्यांनी आपल्या काम-गिरीचा आणि वैज्ञानिक पद्धतीचा उदो उदो केला. शेवटी या सर्व प्रचाराला पंथीय किंवा सांप्रदायिक स्वरूप आले. एखाद्या ज्येष्ठ शास्त्रज्ञाचे बरळणे सुद्धा एखाद्या सिद्ध पुरुषाची भविष्यवाणी म्हणून गणली जाऊ लागली. म्हणून Adam Smith सारखा थोर विचारवंतही आपल्या Wealth of Nations या ग्रंथात सहज लिहून गेला की "फाजील उत्साह आणि अंधश्रद्धा यांच्यावर विज्ञान हेच एक रामबाण औषध होय." हाच स्मिथ आज हयात असता आणि तो स्वतः शास्त्रज्ञ नसता तर त्याच्याकडून विज्ञानाबद्दल असे गौरवोद्गार निघाले नसते. उलटे त्याला असा अनुभव आला असता की इतरत्र नव्हे तर खुद्द विज्ञानक्षेत्रातच फाजिल उत्साहाचे आणि भ्रामक समजु-तीचे विष पेरले गेले आहे.

माझ्या भूमिकेवर अतिरेकीपणाचा आरोप केला गेला तर त्यात आश्चर्य नाही. काही शास्त्रज्ञ माझे अज्ञान काढतील. काही मी मुद्दामच लोकांच्यामध्ये भीतीच्या अफवा उठवितो आहे म्हणूनच आग पाखडतील. परंतु सुदैवाने शास्त्रज्ञांमध्येही सामान्यज्ञान असणारी जाणती मंडळी आहेतच. ती मात्र आपण होऊन नाकारतील की त्यांची वर्णी अपवादात्मक अशा उच्च वर्गात करावी म्हणून. लेखाच्या आरंभाला जे प्रश्न विचारले होते, त्यांना नाही म्हणून उत्तर देणारी हीच मंडळी.

या संदर्भात एक मूलभूत प्रश्न उभा राहतो, ज्ञान संपादन करणे आणि श्रद्धा बाळगणे या दोन मानवी कृतींमध्ये माणूस एकाच प्रकारच्या मानसिक अवस्थांतून जातो की वेगवेगळ्या अवस्थातून ? या प्रश्नात ज्ञान म्हणजे विशेषतः विज्ञान हे अभिप्रेत आहे. या बाबतीत काही थोर विचारवंतांची मते खालीलप्रमाणे आहेत :

Noam Chomsky म्हणतो की The same innate principles of mind that make possible the acquisition of knowledge and systems of belief might also impose limits on scientific understanding that excludes scientific knowledge of how knowledge and belief are acquired or used, though such understanding might be attainable by an organism differently or more richly endowed.

Kant म्हणतो की Schematism of our understanding in its application to appearance and their mere form, is an art concealed in the depths of human soul, whose real modes of activity nature is hardly likely ever to allow us to discover, and to have open to our gaze.

Jacques Monod या भाषाशास्त्रज्ञाने आणि Henry More या केंब्रिजमधील विचारवंताने अशाच प्रकारचे विचार व्यक्त केले आहेत.

तात्पर्य, माणसाची बौद्धिक घडण मानसिक उत्क्रांतीच्या एकाच तत्त्वानुसार झाली आहे. पातळी उच्च नीच असू शकेल. परंतु शास्त्रज्ञाची बुद्धी आणि प्रतिभा वेगळी आणि थोर साहित्यिकाची किंवा कलावंताची बुद्धी आणि

प्रतिभा वेगळी असे मानण्यासाठी कोणताही सैद्धान्तिक आधार नाही. म्हणूनच शास्त्रज्ञांपाशी अशी कोणतीही विशेष कुवत नाही की ज्यामुळे इतरांनी त्यांचे लाड करावे.

आता शास्त्रज्ञ कोणाला म्हणावे हेही तपासले पाहिजे. ज्याने विज्ञानाचे शिक्षण घेऊन उत्तम पदवी मिळविली आहे आणि जो एखाद्या विद्यालयात किंवा महाविद्यालयात विज्ञान शिकवितो आहे त्याला शास्त्रज्ञ कोणीच म्हणणार नाही. परंतु तोच जर एखाद्या विद्यापीठात संशोधन करीत असेल तर तो शास्त्रज्ञ गणला जातो. हाच पदवीधर पुढे उद्योग किंवा व्यवस्थापन क्षेत्रात घुसला तर तो एक उच्चाधिकारी होईल. शास्त्रज्ञ ही त्याची पदवी गळून पडेल. तात्पर्य, शास्त्रज्ञाने आपले विज्ञानक्षेत्र सोडले तर तो शास्त्रज्ञ रहात नाही. एखादा शास्त्रज्ञ लोकसभेचा सदस्य झाला तर तो प्रथम राजकारणी म्हणून ओळखला जाईल. या चर्चेवरून असे दिसते की शास्त्रज्ञाची व्याख्या जरी स्पष्टपणे करता आली नाही; तरी काही सामान्य आडाखे आहेत की ज्यांच्या आधारांवर शास्त्रज्ञ हुडकून काढणे शक्य आहे.

विज्ञानामध्ये 'शुद्ध' विज्ञान आणि 'उपयोगित' विज्ञान असे दोन प्रकार आहेत. त्यानुसार शास्त्रज्ञांतही 'शुद्ध' शास्त्रज्ञ आणि 'उपयोगित' असे कंपू आहेत. यांपैकी शुद्ध शास्त्रज्ञ स्वतःला फार थोर समजतात. गणितक्षेत्रातील हे दोन कंपू 'आपल्यापैकी श्रेष्ठ कोण' हा वाद अगदी रंगून खेळतात. शुद्ध गणिती मानतात की खरे गणितशास्त्र म्हणजे शुद्ध गणितशास्त्र, कारण त्याचा कोणताही व्यावहारिक उपयोग होत नाही. तसा उपयोग झाला तर तो अपमान असे त्यांचे ठाम मत आहे. एकाने तर चक्क म्हणून टाकले आहे की खऱ्या गणितशास्त्राने आजपर्यंत झालेल्या कोणत्याही मानवी युद्धात एवढीशीदेखील मदत केलेली नाही. उदाहरणार्थ, सापेक्षतावाद किंवा अंकांचा सिद्धांत यांनी कोणती रणभूमी गाजविली आहे? उलट बॅलिस्टिक्स आणि एरोडायनॅमिक्ससारख्या उपयोगित गणितशास्त्रांनी युद्धअस्त्रांची संहारशक्ती वाढविली आहे. इतका उपयोग होऊन देखील या उपयोगित शास्त्रांना मान नाही. उलट जी कोणत्याही उपयोगी पडत नाहीत त्या शुद्ध शास्त्रांचा मात्र दरारा– बडेजाव ! एक गणिती लिहितो की, "शुद्ध गणितीशास्त्रज्ञाचे मन निर्मळ असते. तो जितका निरुपद्रवी असतो तितकाच निरपराधी असतो."

या संदर्भात Hardy या प्रसिद्ध गणितशास्त्रज्ञाचे मतलबी विचार लक्षात घेण्यासारखे आहेत. तो म्हणतो "माझ्या हातून उपयोगी असे काहीही घडले नाही. माझ्या संशोधनामुळे आता आणि पुढेही काहीही बरे-वाईट होणार

नाही. मी फक्त माझा विषय काही विद्यार्थ्यांना शिकविला आणि त्यांना त्या विषयात पारंगत बनविले. माझ्याकडून गणितशास्त्राच्या ज्ञानात थोडी फार भर पडली असेल. परंतु तशी भर लहानमोठ्या प्रमाणात थोर साहित्यिक आणि प्रतिभावंत कलावंतही घालतातच. या सान्यांच्या कृती म्हणजे त्यांनी मानवजातीला दिलेली देणगीच होय."

या विचारामध्ये हार्डीला येनकेनप्रकारेण थोर साहित्यिक आणि कलावंत यांच्या ओळीत जाऊन बसण्याविषयी किती घाई लागली आहे हे स्पष्ट होते. त्याच्या या डावाला मतलबी म्हणण्याचे कारण म्हणजे तो अप्रत्यक्षरीत्या उपयोगित शास्त्रज्ञांची वर्णी दुय्यम दर्जाच्या साहित्यिक आणि कलावंत मंडळीबरोबर लावून मोकळा झाला आहे. हार्डीचा अट्टाहास असे भासविण्याचा आहे की शुद्ध शास्त्रज्ञ मंडळी त्यांच्या कामातच मग्न असतात. समाजापासून अलिप्त असतात. तेव्हा त्यांना कोणतीही सामाजिक जबाबदारी नाही. उलट समाजाने त्यांचे कौतुक करणे चालू ठेवले पाहिजे. जबाबदारी टाळण्याची कोण धडपड ही !

हेच बेरकी शास्त्रज्ञ म्हणतात की आमच्या ज्ञानाचा उपयोग कोणी कसाही करोत त्याच्याशी आम्हाला कर्तव्य नाही. म्हणून आमचा खाक्या वेगळा. इतरांच्याप्रमाणे उपयोगित शास्त्रज्ञांना जबाबदार धरा. त्यांच्यावर बंधने घाला. काहीही करा.

मी विचारतो, हा प्रकार चालू द्यावा काय ! मुळीच नाही. राजकारणी लोकांनी आणि लोकसेवकांनी हे जाणून शास्त्रज्ञांना वेगळी खास वागणूक देऊ नये. थाटाचीही नको; जाचाचीही नको. माणूस, मग तो कोणीही असो, त्याला त्याच्या कृतीबद्दल जबाबदार धरलेच पाहिजे. एवढेच नव्हे तर त्याच्या कृतीतून पुढे काय घडते याचीही जबाबदारी त्याच्यावरच टाकली पाहिजे. कारण शास्त्रज्ञाला उत्तम शिक्षण मिळालेले असते. कार्यकारणभाव त्याला चांगला माहीत असतो. आपल्या कृतीचे काय बरे-वाईट परिणाम होतील हे तो जाणू शकतो. अशा जबाबदारीतून राष्ट्रपती, मुख्य न्यायाधीश, सेनापती, पंतप्रधान सारख्या उच्चपदीय व्यक्ती देखील सुटत नाहीत. तेव्हा शास्त्रज्ञांना मात्र ही सूट द्यावी हे न्याय्य नाही. शास्त्रज्ञांच्या कृतीचे परिणाम व्यापक आणि दूरगामी असल्यामुळे त्यांनी या बाबतीत इतरांच्या पेक्षा जास्त जागरूक रहावे ही अपेक्षा योग्यच म्हटली पाहिजे. शास्त्रज्ञांनी हे अवधान राखणे जरूरीचे आहे. 'कलेसाठी कला' या चालीवर 'विज्ञानासाठी विज्ञान' ही हाकाटी त्यांना मारता यावयाची नाही. कलेसाठी कला हा सिद्धांतही पूर्णपणे प्रस्थापित झालेला नाही. तात्पर्य, शास्त्रीयकृती ही माणसाच्या इतर कोणत्याही कृतिसमान लेखली पाहिजे.







शास्त्रज्ञाची सामाजिक जबाबदारी हा मतभेदाचा प्रश्न नाहीच मुळी. कारण कायद्याने किंवा घटनेने त्याला विशेष हक्क दिलेले नाहीत; आणि ते तसे देता येणारही नाहीत. म्हणून शास्त्रज्ञांना आपली जबाबदारी नाकारता येणार नाही. टाळता येणार नाही. त्यांनी आपण कोणी विशेष आहोत असे वाटून घेतले तर घेतले; परंतु समाजाने त्यांना इतरांच्या प्रमाणे समान वागणूकच दिली पाहिजे.

एकदा हे तत्त्व स्वीकारले तर शास्त्रज्ञांना नोकरीमध्ये विशेष सवलती द्याव्यात हा मुद्दा आपोआपच गळतो. उद्योगधंद्यांत, प्रयोगशाळात, विद्यापीठात शास्त्रज्ञांच्या लायकीवर नेमणुका होतील. साहित्य, कला, व्यवस्थापन वगैरे क्षेत्रात हेच चालू आहे. शासनाने सर्वच उपकारी मानवी कृतींना उत्तेजन द्यायचे असते. त्याचप्रमाणे शासन शास्त्रज्ञांनाही उत्तेजन देईल. परंतु प्रत्यक्ष संशोधनात लुडबूड करणार नाही. त्याने तसे करू नये.

शास्त्रीयकार्य वाढण्यास काय करावे याची निश्चित कल्पना कोणालाही नाही. शास्त्रज्ञांनाही नसते; परंतु पुढे काय साधायचे आहे ते केवळ शास्त्रज्ञां-वरच सोपविलेले नाही. त्या बाबतीतील महत्त्वाच्या निर्णयांमध्ये राज्यकर्तेही सहभागी व्हावे लागतात.

आगामीकालात पुष्कळ काही होणार आहे. उदाहरणार्थ, वाहतुक आणखी जलद होईल. त्या प्रमाणात अपघाताचा धोकाही वाढेल. परंतु काही झाले तरी सुख आणि दुःख यांचे मिश्रण असलेले मानवी जीवन तसेच राहणार आहे. भीती ही की कदाचित भविष्यामध्ये शास्त्रज्ञांना आणखी महत्त्व येईल. दुर्दैवाने तसे झाले तर मानवी इतिहासात एक नवे पर्व सुरु होईल. मध्ययुगात माणसाने धर्माचा बुरखा पांघरलेल्या जुलमी सत्तेशी टक्कर देऊन ती मोडून काढली; त्याप्रमाणे पुढील शतकातील माणसाला विज्ञानाच्या जुलमी सत्तेशी झुंझावे लागेल.

दुर्दैवाने ही गोष्ट अजूनही आपल्या राज्यकर्त्यांच्या लक्षात आलेली नाही. म्हणूनच ते परदेशी स्थायिक झालेल्या शास्त्रज्ञांची मायदेशी परत या अशी मनधरणी करीत आहेत. म्हणूनच बेकार शास्त्रज्ञांची जंत्री ठेवली जाते आणि त्यांना सरकारी खजिन्यातून लठ्ठ पगार वाटले जातात. एखाद्या बेकार पत्रकाराला, कलावंताला, व्यवस्थापकाला, प्राध्यापकाला सरकार घरबसल्या पगार द्यावयास सरसावेल का ? नाही.

मी विचारतो, कां नाही ? शास्त्रज्ञांचे मात्र लाड आणि बाकीच्यांची साधी विचारपूसही नाही. हे का ? या प्रश्नाने भंडावले आहे. तुम्हालासुद्धा या प्रश्नाने भंडावले पाहिजे. हीच माझी इच्छा !

◇ ◆ ◆

अनुक्रमणिका